Mr. Pradhan has done a valuable service to the present generation especially the young people of to-day by his splendid exposition in plain, popular, and elegant *Marathi* of the modern scientific view of the subject. He has strengthened the opinion of science by showing that it agrees with the saying of the Sages of ancient and modern India on the subject. The principles inculcated in the essay are so important and instructive that I earnestly wish that the pamphlet be widely circulated among the old and young people of to-day in " Maharashtra."

POONA, *17th October 1903.* } Sd. Ganesh Krishna Garde, L. M. & S.

---

" Mr. M. R. Pradhan's " **Brahmacharya** and **Grahasthashrama** " is an interesting essay and will repay its perusal. It is an attempt in the right direction."

AMRAOTI, *25th October 1903.* } Sd. Raghunath Balkrishna Talwalkar, B. A. *H. M., Govt. High School, Amraoti.*

# ग्रंथमाला

मासिक पुस्तकांत छापलेलें प्रकरण

# ब्रह्मचर्य आणि गृहस्थाश्रम

" What the young people of to-day are making of themselves physically, mentally and morally, is deciding what shall be the future of the country.

Mary Wood-Allen, M. D.

हा निबंध

(एका इंग्रजी निबंधाचे आधारें)

रा. रा. महादेव रामचंद्र प्रधान, बी. ए.

यांनीं लिहिला

तो

विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.,

संपादक ग्रंथमाला

यांणीं

'श्रीसमर्थप्रसाद' छापखान्यांत छापविला.

किंमत ८ आणे.

# समर्पण

ठाणें येथील चांद्रसेनीय कायस्थ प्रभु सामाजिक संस्थेला,
तिचे अनेक स्तुत्य हेतू मनांत आणून
हें पुस्तक कृतज्ञतापूर्वक
अर्पण केलें आहे.

महादेव रामचंद्र.

# प्रस्तावना.

राष्ट्र ह्मणजे अनेक व्यक्तींचा समुदाय. आणि राष्ट्रोन्नति ह्मटली ह्मणजे राष्ट्रांतील व्यक्तींची उन्नति होय. व्यक्तीची उन्नति ही ज्याच्या त्याच्या आत्मशिक्षणावरच अवलंबून असते. आपल्या अंगच्या सर्व शारीरिक, मानसिक आणि नैतिक सामर्थ्यांची वाढ योग्य प्रमाणानें करणें याचें नांव शिक्षण. आपली प्रजा सुशिक्षित निपजावी अशी बहुतेक मातापितरांची इच्छा असते; पण मुलांच्या शिक्षणाचे बाबतींत ज्या प्राथमिक गोष्टींचा अवश्य विचार व्हावयास पाहिजे, त्याकडे त्यांचें लक्ष मुळींच नसतें, असें ह्मणणें धाडसाचें होईल असें वाटत नाहीं. आज मुलांना शाळांतून जें शिक्षण मिळतें तेवढ्यानें इष्ट हेतु सिद्धीस जात नाहीं अशी ओरड चोहोंकडून सारखी सुरू आहे. याचें मुख्य कारण शारीरिक शिक्षणाकडे दुर्लक्ष हेंच होय. शारीरिक शक्तींचा ऱ्हास होत असल्या-मुळें, मानसिक शक्तींचा विकास होऊन न होऊन सारखाच. शाळें-तील शिक्षणानें मनावर कायमचे सुसंस्कार घडल्याचीं उदाहरणें शेंकडा दहा तरी सांपडतील किंवा नाहीं याची शंका आहे. शाळेंतील शिक्षण संपलें ह्मणजे आपण एकदाचे मोकळे झालों, अशी बहुतेकांची दृढ समज झालेली असते. विश्वविद्यालयांतून शिक्का मोर्तब घेऊन बाहेर पडणाऱ्या पदवीधरांपैकीं किती जणांनीं आपली वाचनाभिरुचि कायम ठेवून ज्ञानप्राप्ति अव्याहत चालू ठेविली आहे? केवळ करमणुकीसाठीं ह्मणून वृत्तपत्रांचें आणि कादंबऱ्यांचें जें वाचन होतें, तें जमेस धरावयाचें नाहीं. खरें शिक्षण हें होय कीं, ज्याच्या योगानें जगाच्या इतिहासा-वर प्रकाश पडून आपल्या उन्नतीचा मार्ग आपणास उज्ज्वल दिसूं लागतो; पण खेदाची गोष्ट ही होय कीं, आमची उन्नति होण्याऐवजीं आह्मीं

सारखे अवनतीप्रत जात आहोंत. याचें कारण प्रथमारंभापासून शारीरिक शिक्षणाकडे दुर्लक्ष झाल्यामुळें, आमचे अंगीं आलेलें शारीरिक दौर्बल्य अथवा निरुत्साह हेंच होय. मनुष्याला पूर्णत्व येण्यास शांतचित्त आणि निरोगी शरीर या दोन गोष्टी अत्यंत महत्वाच्या आहेत. पण सुशिक्षितवर्गींपैकीं बहुतेकांच्या ठिकाणीं या दोहींचाहि अभाव दृष्टोत्पत्तीस येतो; कारण मानसिक व्यापार सुरळितपणें चालणें, हें सर्वांशीं शरीराच्या सुस्थितीवर अवलंबून आहे. पण शिक्षणक्रम आटोपण्याचे पूर्वीच **अकालीं** जनकत्व प्राप्त होण्यानें व ज्या वीर्याचा विनियोग ज्ञानप्राप्त्यर्थ अंगीं जोम व उत्साह कायम राहण्यासाठीं व्हावयाचा त्याचा अन्यमार्गानें अपव्यय झाल्यानें शारीरिक स्थिति अत्यंत शोचनीय झालेली दृष्टीस पडते. अशा हीन स्थितींत मनुष्याचे हातून कोणतेंच काम तडीस जात नाहीं. मग देशहिताचें तर नांवच घ्यावयास नको. ह्या नरजन्मामध्यें जेवढी उन्नति साध्य आहे तेवढी साधून घ्यावयाची असेल, तर मनुष्यानें आत्मसंयमन आणि ब्रह्मचर्य ह्यांच्यायोगानें आपलें आरोग्य, बल आणि उत्साह ह्यांचें रक्षण केलेंच पाहिजे. सारांश शिक्षणाचे बाबतींत पहिली महत्वाची गोष्ट ह्मटली ह्मणजे आरोग्य अथवा शारीरिक शिक्षण हीच होय. राष्ट्रीय आरोग्यसंपत्तींत भर घालणें हा राष्ट्रीयसुखसंवर्धनार्थ एक खात्रीलायक उपाय होय. सुख हें परिस्थितीवर अवलंबून नसून तें एकप्रकारची मानसिक अवस्था आहे ही गोष्ट वारंवार लोक विसरतात; व सुख व सुखप्राप्तीचीं साधनें यांच्यांतील भेद मनांत न आणून ते साधनाकरितांच नेहेमीं सुखावर पाणी सोडितात. केवळ संपत्ति आणि पदवी ह्यांच्यायोगानें सुख प्राप्त होत नाहीं. प्रीति, औदार्य आणि शांति हे गुण जर मनुष्याच्या ठिकाणीं नसले तर कितीहि संपत्ति आणि अधिकार मिळाला तरी सुख प्राप्त होणें शक्य नाहीं. व वरील गुण निरोगी शरीरावांचून इतरत्र केव्हांहि वास करीत नाहींत. आणि निरोगी शरीर हें शारीरिक तपाचरणावांचून प्राप्त होणें नाहीं. शारीरिक तपाचें प्रमुख

अंग ह्मटलें ह्मणजे कडकडीत ब्रह्मचर्य हें होय. या तपांत स्वतःच्या शरीराची शुद्धि व बलवृद्धि ह्या दोन गोष्टी विशेष लक्ष पुरविण्याजोग्या आहेत. ब्रह्मचर्यव्रत हीच सात्विक तपाची आद्य पायरी होय. ब्रह्मचर्याचा ऱ्हास झाला ह्मणजे देशाची अवनति झालीच ह्मणून समजावी. याच्या प्रत्ययास आह्मास फार लांबवर दृष्टि फेंकण्याची गरज नाहीं. आमच्या हल्लींच्या भिकार चाळ्यांनीं आमच्या राष्ट्रीय ब्रह्मचर्यावर केवढे दुर्धर घाले पडले आहेत. आह्मीं लवकर मुलांचे जनक व्हावें ह्मणून आमच्या मातापितरांनीं आमचा व्रतबंधविधीनंतरचा काल संपुष्टांत आणून सोंवळें ( शुचिर्भूत ) राहण्याच्या व नेमस्त आहारविहाराच्या व्रताचें उद्यापन किती लवकर उरकून घेतलें; आमचे विचार पोक्त व्हावेत ह्मणून आह्मास काव्यनाटकांचा परिचय किती लवकर झाला; स्त्रीविरहाचें अघोर संकट भोगण्याची पाळी आह्मास येऊं नये ह्मणून आह्मास स्त्रीपुरुषसमागमसुख किती लवकर प्राप्त करून दिलें. सारांश अशाप्रकारच्या अनेक गोष्टींनीं आमचें जें नुकसान झालें आहे तें सांगतां येत नाहीं. तेव्हां आमचें झालें तें झालें; पण ज्यांच्यावर राष्ट्राची सर्व मदार अशा आमच्या भावीप्रजेची तरी, आह्मी खबरदारी घेणें हें आपणांपैकीं प्रत्येकाचें कर्तव्यकर्म नव्हे काय? राष्ट्राचा उत्कर्ष वा अपकर्ष हा सर्वांशीं तरुण पिढीच्या शारीरिक, मानसिक आणि नैतिक उन्नतीवरच अवलंबून आहे; व आपल्या देशाची भावी स्थिति कोणत्याप्रकारची होणार ही गोष्ट आमच्या हल्लींच्या तरुण पिढीच्या शारीरिक, मानसिक आणि नैतिक आचरणावरूनच ठरवितां येणारी आहे. आईबाप मुलांना नुसतें शरीर देत नाहींत. तर शरीराबरोबर कांहीं शारीरिक गुणदोष व कांहीं मनोविकारहि देत असतात, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. तेव्हां तरुण प्रजेच्या शारीरिक, मानसिक आणि नैतिक उन्नतीची काळजी बाळगणाऱ्या प्रत्येक मातापितरांनीं स्वतः गृहस्थाश्रमांतच राहून ब्रह्मचर्यव्रतासारखें शारीरिक तपाचरण आस्थापूर्वक करून आपल्या संततीलाहि तोच कित्ता घालून

दिल्यास, ती निर्दोषी, शरीरानें सुदृढ, मनानें निर्मल आणि सुशिक्षित निपजल्यावांचून खात्रीनें राहणार नाहीं. मुलें निसर्गतःच अनुकरण करणारीं असतात व त्यांची दानत, स्वभाव आणि संवयी, यांना अमुक एक प्रकारचें वळण लागण्याचा योग्य काल ह्मटला ह्मणजे बाळ-पणापासून तरुणपणापर्यंतचाच होय. या वयांत मातापितरांनीं आपलें आचरण शुद्ध ठेवून त्यांना जर कडकडीत ब्रह्मचर्यव्रत पाळावयास लाविलें, त्यांचें शरीर शुद्ध आणि मन निर्मल जेणेंकरून राहील अशी खबरदारी घेतली, अर्थात् विद्या संपादन पूर्ण होईपर्यंत त्यांना अविवा-हितदशेंत ठेवून शृंगाररसप्रधान काव्यनाटकांचा व विषयसुखाचा परि-चय होऊं न दिला, तर त्यांची गृहस्थाश्रमदशा आपल्यापेक्षां शतप-टीनें आनंदजनक व सुखावह होईलच होईल.

ह्या वरील हेतूनेंच सदरहू पुस्तक वाचकांना सादर करण्यांत आलें आहे. यांत दाखविलेल्या दिशेनें आपलें आचरण सुधारण्याची स्फूर्ति शंभरांत एकाला जरी झाली, तरी लेखकाच्या श्रमाचें अंशतः चीज झाल्यासारखें होईल, आणि ह्मणून प्रत्येक मातापितरांनीं, पालकांनीं आणि शिक्षकांनीं हें पुस्तक एकवेळतरी अवश्यमेव वाचून यांतील उपदेश तरुणपिढीच्या कोमल मनावर कायमचा बिंबविण्याचा प्रयत्न करावा अशी त्यांना माझी सविनय प्रार्थना आहे. असा प्रयत्न झाल्यास, आह्मीं जरी आज निरुत्साही, कर्तव्यपराङ्मुख, परावलंबी, व निर्जीव झालों आहोंत, तरी आमची भावी प्रजा सुसंस्कृत मनाची, चांगल्या संवयींची, सत्याकरितां, देशाकरितां, कर्तव्याकरितां, स्वार्थावर उदक सोडणारी, ईश्वरावर व स्वधर्मावर विश्वास ठेवून आपलें आचरण निष्क-लंक ठेवणारी, प्राप्त झालेल्या स्थितींत अंगावरची जबाबदारी योग्य रीतीनें बजावणारी व सर्वथैव नांव घेण्यास योग्य अशी निपजणें अद्यापही शक्य आहे हें लक्षांत ठेवावें.

असो. प्रस्तुत पुस्तकास आधार एका छोटेखानी इंग्रजी निबंधाचा असून त्याचें नांव ' मॅरीड स्टेट अँड ब्रह्मचर्य ' हें आहे. हा निबंध

पुस्तक रूपानें प्रसिद्ध होण्याचेपूर्वी मद्रास येथील ' थीऑफिस्ट ' नामक मासिकांतून प्रसिद्ध होऊन गेला होता. लेखकानें सदरहू निबंधावर आपलें संपूर्ण नांव प्रसिद्ध न करतां नुसतें जी. वी. के. असें संक्षिप्त नांव दिलें आहे. केवळ विनयानें त्यांनीं आपलें संपूर्ण नांव प्रसिद्ध केलें नसावें असें वाटतें. कसेंहि असो. त्यांच्या कृतीवरून त्यांच्या अंगच्या योग्यतेची पारख होत आहे. त्यांनीं या निबंधाचे रूपानें जी एकप्रकारें देशसेवा केली आहे ती खरोखर अमूल्य आहे व त्याबद्दल त्यांचे आपण आभार मानावे तितके थोडेच होणार आहेत. निबंधांतील विषय इतक्या मार्मिक रीतीनें, इतक्या स्पष्ट व जोरदार भाषेनें त्यांनीं प्रतिपादन केला आहे कीं, तें पुस्तक एकदां वाचावयास घेतल्यास संपूर्ण वाचन झाल्याशिवाय बाजूस ठेवावेंसें वाटतच नाहीं.

अशा नाजुक आणि अत्यंत महत्वाच्या विषयावर वरील पुस्तकाचे धर्तीवर महाराष्ट्र भाषेंत एखादें लहानसें पुस्तक झाल्यास समाजास व विशेषेंकरून तरुणपिढीस विशिष्ट प्रकारचें वळण लावण्यास अत्यंत उपयोगी पडेल असें वाटल्यावरून हें पुस्तक ठाणें येथील **चांद्रसेनीय कायस्थ प्रभु सामाजिक संस्थेच्या** सूचनेवरून मुद्दाम तयार केलें आहे. कोणतेंहि कार्य तडीस जाण्यास द्रव्यानुकूलता लागते ही गोष्ट जरी खरी आहे तथापि केवळ द्रव्यावरच दृष्टि देऊन जें कार्य करण्यांत येतें त्याचा इष्ट हेतू सिद्धीस जात नाहीं, हें पूर्णपणें जाणून अशा महत्वाच्या व लोकोपयोगी पुस्तकाचा प्रसार जितका अधिक होईल तितका करावा या सद्धेतूनें पुस्तकाची किंमत फार स्वल्प ठेवून गरीब विद्यार्थ्यांना तर हीं पुस्तकें फुकट वांटण्याचें संस्थेनें योजिलें आहे. याप्रमाणें हें पुस्तक तयार करण्याचें सर्व श्रेय त्या संस्थेकडेसच आहे ह्मणून हें पुस्तक आह्मीं त्या संस्थेस मोठ्या नम्रपूर्वक अर्पण केलें आहे.

शेवटीं हें पुस्तक तयार करण्याचे कामीं ज्या एका मार्मिक विद्वान् गृहस्थानें साहाय्य केलें, त्यांचे व आमचे तरुण मित्र श्रीयुत **रामकृष्ण**

**रावजी जयवंत,** बी. ए., एल्एल्. बी. नासिक यांनीं हस्तलिखित प्रत वाचून ज्या कांहीं उपयुक्त सूचना केल्या, त्याबद्दल त्यांचे आभार मानून व ज्याच्या कृपेनें ही अल्पकृति तडीस गेली त्या जगन्नियंत्याला अनन्य भावानें शरण जाऊन वाचकांचा निरोप घेतों.

मु० उमरावती,<br>ता० १८ माहे एप्रिल<br>सन १९०३

**महादेव रामचंद्र प्रधान.**

॥ श्रीसद्गुरु ॥

# ' ब्रह्मचर्य आणि गृहस्थाश्रम. '

---

' The youth of today have in their own hands the moulding of the future, not only of themselves, but of the nation by the evey day habit of their lives.'

MARY WOOD ALLEN, M. D.

' आपल्या आयुष्यांतील रोजच्या संवयींच्यायोगें केवळ आपल्या स्वतःच्याच नव्हे तर आपल्या राष्ट्राच्याही भावी स्थितीला अमुक एक प्रकारचें वळण लावणें ही गोष्ट आजच्या तरुणपिढीच्याच सर्वस्वी स्वाधीन आहे. '

---

ज्या आर्यावर्तांत आमच्या पूर्वजांनीं एके कालीं ज्ञानानें आणि पराक्रमानें साऱ्या दुनियेला दिपवून सोडिलें, **सनातन आर्यधर्माचा** प्रचंड आणि **अव्यय** वृक्ष जेथें लावून टेविला, ज्या ठिकाणीं पाणिनि, वाल्मिकी, कालिदास, आर्यभट्ट, भास्कराचार्य, गदाधरभट्ट वगैरे असंख्यात महात्मे निपजले, जेथें राम पांडवादिक नाहीं धरले, तरी विक्रमादित्य, इतिहासप्रसिद्ध पोरस, शिवाजी, बाजीराव, यशवंतराव, रणजितसिंग, असे अनेक तरवारबहादूर शूर निपजले, जेथें **तुकाराम, रामदास** किंवा रामशास्त्री, माधवराव असे पुण्यशील महात्मे व रमाबाई, अहिल्याबाई, झांशीची लक्ष्मीबाई, आणि अगदीं अलीकडील बायजाबाई शिंदे अशा भूतलास भूषित व पवित्र करणाऱ्या धन्य माता आणि वीरपत्नी निर्माण झाल्या, त्याच आर्यावर्तांत प्रस्तुतकालीं आपल्या पूर्वजांचें नांव

गाजविणारें एखादेंहि मानवरत्न निपजूं नये, एवढ्या निकृष्टावस्थेंत आज आह्मीं पडलों आहोंत, हें पाहून क्षणभर खेद वाटतो. हल्लीं हिंदुस्थानाला दारिद्र्यानें चोहोंकडून घेरलें आहे, आणि दारिद्र्यस्थितींत कोणासहि काय आपल्या उन्नतीचीं कार्यें करितां येत नाहींत इतकेंच नव्हे, तर असलेल्या स्थितीचाहि क्रमशः नाश होत होत ती पूर्ण निकृष्टावस्थेला जाऊन पोहोंचते व आमच्या या हीन स्थितीमुळेंच आमच्या शारीरिक, मानसिक आणि नैतिक उन्नतीचा पाया अगदीं ढासळून जाऊन आमची राष्ट्ररूपी इमारत होती कीं नव्हती अशा स्थितीला येऊन पोहोंचली आहे. आमच्या या अवनत स्थितीचीं जीं कांहीं अनेक कारणें आहेत त्यांपैकीं एक ढळढळीत कारण ह्मटलें ह्मणजे आर्यावर्तांतील आमच्या पूर्वजांच्या ज्या कांहीं उत्तम चालीरीति होत्या त्या सांप्रत काळीं अगदीं लुप्तप्राय झाल्या आहेत हें होय. व पूर्वजांच्या अंगच्या ज्या कांहीं अनुकरणीय चालीरीतींचें पुनरुज्जीवन होणें अत्यावश्य आहे असें वाटतें, त्यांपैकींच आजच्या तरुणपिढीनें, केवळ आपल्या विद्यार्थिदशेंतच नव्हे, तर गृहस्थाश्रम स्वीकारल्यानंतरही, ब्रह्मचर्यव्रत पूर्णपणें पाळणें ही एक चाल होय. आमच्या राष्ट्राच्या अवनतीला जर एखादी गोष्ट प्रमुखत्वानें कारणीभूत झाली असेल, तर आजच्या तरुणपिढींत स्पष्ट दिसून येणारा ब्रह्मचर्यव्रताचा लोप हीच होय असें कोणीही शोधकबुद्धीनें विचार करणारा कबूल करील.

प्राचीनकालीं आमच्या पूर्वजांनीं जीं मोठमोठीं गहन विचारांचीं आणि अतुल पराक्रमांचीं कामें केलीं तीं सर्व ब्रह्मचर्यव्रतानें संपादित केलेल्या शारीरिक सामर्थ्याच्या जोरावर केलीं होतीं. शरीर सुदृढ तर मन सुदृढ. हें तत्व त्याकालीं लोकांच्या मनांत पूर्णपणें बिंबलें होतें. उत्कृष्ट शरीर ही एक मोठी देणगी आहे आणि भावी सर्व सुख आणि सर्व पराक्रम तिजवर अवलंबून आहेत ही गोष्ट आमच्या पूर्वजांच्या मनांत नित्य होती. त्यांच्यावेळींही उत्कृष्ट शारीरिक संपत्ति तरुणपणांत व्रतस्थ राहून संपादन करण्यांत येत होती. ब्रह्मचर्यव्रता-

सारखें पुरुषार्थदायक अन्य शारीरिक व्रत नाहीं असा त्यांचा दृढ समज होता. मोठमोठीं राजकीय आणि सामाजिक कार्यें पार पाडण्यास व्रतस्थ तरुणांचीच जरूर लागते. व त्यांच्या साहाय्यानेंच तीं सर्वत्र तडीस गेलीं आहेत. ब्रह्मचर्यव्रत हीच सात्विक तपाची आद्य आणि सर्वश्रेष्ठ पायरी होय; कारण या पायरीवरच भावी प्रचंड इमारत उभारण्यांत येत असते. ब्रह्मचर्याचा ऱ्हास झाला ह्मणजे देशाची अवनती झालीच, व ह्या गोष्टीचें प्रत्यंतर आमचे आह्मापाशींच आहे. आज ब्रह्मचर्याची उपेक्षा करून अनाचाराचें खूळ इतकें माजलें आहे कीं, हल्लींची तरुण पिढी आपल्या हातानें आपल्या आयुष्याचें छेदन करून घेत आहे; व तेणेंकरून राष्ट्राला दिवसानुदिवस हीन स्थिति प्राप्त होत आहे. धिप्पाड, कणखर, जबरदस्त, बळकट अशा प्रकारचीं विशेषणें हल्लींच्या संततीला मिळण्याइतकी पुण्याई आज आमचे-जवळ नाहीं अशी अधिकाधिक खात्री होत आहे. निग्रहानें आणि नेटानें काम करणारीं माणसें आज आह्माला दुर्मिळ झालीं आहेत. करारीपणा अथवा निश्चयीपणा आज कोठें दृष्टीससुद्धां पडेनासा झाला आहे. साहसाच्या नुसत्या कल्पनेनें अंगावर कांटे उभे रहात आहेत. सारांश अशा तऱ्हेच्या आमच्या हीन स्थितींतून आमचें डोकें फिरून एकवार वर निघावें, राष्ट्रीय दृष्टीनें आमचा उत्कर्ष व्हावा, आमच्यांत निग्रही, करारी, साहसी, सदाचरणीं प्रजा निपजावी अशी जर आमची मनापासून इच्छा आहे, तर ती फलद्रूप होण्यास सांप्रतकालीं नष्ट झालेल्या प्राचीनकालच्या ज्या कांहीं अनुकरणीय व आदरणीय चाली-रीतींचें पुनरुज्जीवन होणें अत्यावश्य आहें असें वाटतें, त्यांपैकीं ज्याच्या भक्कम पायावर भावी इमारत मजबूत रीतीनें उभारली जाणार असें शारीरसामर्थ्य संपादन करण्यास अत्यंत उपयोगी असें जें ब्रह्मचर्य-व्रत त्याचा योग्य संस्कार आजच्या तरुणपिढीच्या कोंवळ्या मनावर जेणेंकरून होईल असे उपाय योजणें हें आमच्यांतील सुशिक्षित ह्मण-विणारांचें आद्य कर्तव्य नव्हे काय? या गोष्टीकडे पालकांचें लक्ष अगोदर पोहोंचलें पाहिजे.

असो. पूर्वकालीं मुलाला एकदां सातवें किंवा आठवें वर्ष लागलें कीं, विद्यार्जनार्थ गुरूच्या हवालीं करीत असत. त्या वेळेपासून त्याला गुरुगृहींच वास करावा लागत असे. या आश्रमांत त्याला नऊ किंवा अठरा वर्षें गुरुसेवेंत दक्ष राहून, सदाचारसंपन्न होऊन आणि धर्म आणि नीति यांचा अभ्यास करून, ब्रह्मचर्यव्रत कडकडीत पाळावें लागत असे. येवढ्या कालांत त्याच्या शरीराची वाढ पूर्ण होऊन तो चांगला सुदृढ व कार्यक्षम होत असे. त्या कालीं विद्यार्थिदशेची सीमा वयाच्या २५ व्या वर्षापावेतों जात असे; ह्मणजे पूर्वीं मुलाच्या शरीराची वाढ होण्यास २५ वर्षांचा अवधि लागत असे. पण जसें कालमान फिरलें, तसें या प्रौढ दशेच्या आरंभाचेंहि मान फिरलें. आजच्या कालांत गुरुगृहाची जागा शालागृहानें घेतली आहे. त्या वेळेच्या गुरुगृहांत व आजच्या शालागृहांत जमीनअस्मानाचा फरक पडला आहे. पूर्वीं गुरुगृहीं राहून मुलगा सदाचारी, धर्मशील, नीतिमान्, सुदृढ, सतेज, असा तयार होत असे. हल्लींच्या शालागृहांतून जीं मुलें बाहेर पडतात, त्यांपैकीं कितीकांच्या वांट्याला वरील गुणांपैकीं एखादा तरी येत असेल कीं नाहीं याची कल्पना प्रत्येकाला सहज करितां येईल. सर्वच मुलें आज अनीतिमान् निपजतात असें जरी ह्मणतां यावयाचें नाहीं, तरी हल्लींची शिक्षणपद्धतीच अशी आहे कीं, तेणेंकरून मुलें शिक्षणक्रम आटोपून शालागृहांतून अखेरचीं बाहेर पडलीं ह्मणजे सुदृढ व सतेज अशीं दृष्टीस न पडतां चरकांत घालून पिळून काढिल्याप्रमाणें पोंचट व निस्तेज दिसूं लागतात. याचें मुख्य कारण एवढेंच कीं, शिक्षणक्रम आटोपून शालागृहांतून बाहेर पडण्याचेपूर्वींच त्यांचें ब्रह्मचर्य संपून ते गृहस्थाश्रमी बनतात. पूर्वीं विद्यार्थिदशेंत विद्यार्थ्याला आपलें आचरण फार पवित्र ठेवावें लागत असे. ह्मणजे नुसतें शरीरच नव्हे तर मनहि पवित्र राहील अशी काळजी घ्यावी लागत असे. आणि ह्मणून विद्याध्ययन परिसमाप्त होईपावेतों त्यांना ब्रह्मचर्यव्रत पूर्णपणें पाळावें लागत असें. गुरुगृहींचा वास संपला, अधिकारानुरूप योग्य तें शिक्षण संपादन केलें ह्मणजे मग त्याला गृहस्थाश्रम स्वीकारण्याची

परवानगी मिळत असे; अर्थात् तेव्हांच तो विवाहाला योग्य झाला असें समजलें जात असे. पण हल्लींचा प्रकार सगळाच विपरीत. अर्धे शरीर झिजतें तेव्हां विद्यादेवी कोठें अर्धीमुर्धी हस्तगत होते. ती हस्तगत होण्याच्यापूर्वींच मुलांचे विवाह होऊन कित्येक तर मुलांचे जनक होतात. विवाहाचा आणि विद्येचा असा द्विगुणित बोजा पडून अकालीं जनकत्व अंगीं येणें हें शरीरास अत्यंत अपायकारक आहे. ज्या वयांत अंगीं जोम ह्मणजे अगदीं रसरसलेला असावयाचा त्या वयांत ह्मातार-पणाची छाया पडणें हा अकालीं जनकत्व प्राप्त होण्याचा परिणाम होय; ज्या वयांत हातून एखादें कार्य घडावयाचें, त्या वयांत अंगीं उमेदीचा लव-लेशदेखील दिसत नाहीं. राष्ट्राची सर्व मदार तरुणपिढीवर अवलंबून असते व जेथें तरुणपिढी अशी नाउमेदी निपजत आहे, तेथें राष्ट्रानें आपलें डोकें वर काढावें तरी कसें? राष्ट्रानें आपलें डोकें फिरून एक वार वर काढावें असें ज्यांना वाटत असेल, त्यांनीं तरुणपिढी शरीरानें कणखर व मनानें निर्मल निपजेल, अशी खबरदारी घेतली पाहिजे. मुलांनी तरुणवयांत शरीरानें निरोगी व सुदृढ असावें अशी ज्या पालकांची इच्छा असेल त्यांनीं आपल्या मुलांना विद्यार्थिदशेंत ब्रह्मचर्यव्रत पूर्णपणें पाळावयास लाविलें पाहिजे. ब्रह्मचर्य याचा अर्थ केवळ अविवाहित राहणें हा नाहीं. ब्रह्मचर्यांत शरीर, मन व आचरण हीं पवित्र ठेवावीं लागतात. ह्मणजे शारीरिक ब्रह्मचर्याबरोबर मानसिक ब्रह्मचर्यही पाळावें लागतें. कारण शरीर निरोगी आणि सुदृढ ठेवून, मन अमंगल विचारांनीं कलुषित केलें, रेनाल्ड्ससारख्याच्या कादंबऱ्यांचें अथवा शृंगाररसपरिप्लुत नाटकांचें वाचन अथवा अवलोकन केलें, तर मनाचें पावित्र्य ढळून जाऊन, ब्रह्मचर्य पाळून न पाळून सारखेंच होणार. आमच्या पूर्वजांनीं ब्रह्मचर्यव्रताला जें एवढें महत्व दिलें होतें, त्याचें कारण अगदीं रास्त आहे. तें असें कीं, **भावी पिढीच्या उन्नतीचा पाया या ब्रह्मचर्यव्रतांत घातला जातो.** तरुण मुलांनीं बालवयांत ब्रह्मचर्य आस्थापूर्वक पाळून शरीर लोहासारखें कणखर केल्यास त्यांची भावी प्रजा त्यांच्यासारखीच जोमदार निपजल्याशिवाय राहणार नाहीं.

इंद्रियनिग्रह व ज्ञानार्जन हे ब्रह्मचर्यव्रताचे प्रमुख भाग आहेत. हे कष्टसाध्य आहेत ह्मणूनच ब्रह्मचर्य राखणें प्रयासाचें आहे. पण असें व्रत जो पाळील, त्याला शरीरसंपत्ति, सहनशीलता, आदरबुद्धि, विद्यानंद, सदाचरणाची वाढ असे असंख्य अलभ्य लाभ सहज प्राप्त होतील. अशा सद्गुणांचें बीजारोपण ब्रह्मचर्यव्रतांत होऊन, त्यांचा जो वृक्ष पुढें वाढीस लागतो, त्याचीं मधुर फळें गृहस्थाश्रमांत चाखावयास सांपडतात. सद्गुणमंजरी पूर्णपणें विकसित होण्यास गृहस्थाश्रमासारखी रमणीय भूमिका अन्य कोणतीहि नाहीं.

संसारसुखाचा अनुभव घेत घेत स्वार्थ आणि परमार्थ साधण्याचें, आत्मीय उन्नति करण्याचें जर एखादें रम्य स्थान असेल तर तें गृहस्थाश्रम हेंच होय. कौमार्यावस्थेंत ब्रह्मचर्यव्रत पाळण्यानें ज्या अनेक सद्गुणांचें, प्रेमाचें आणि अभिमानाचें बीजारोपण मानसोद्यानांत झालेलें असतें त्याला अभ्यासाचें सेचन मिळून वाढीस लागलेल्या वृक्षांच्या मधुर व मनोहर पुष्पफलांचा आस्वाद गृहस्थाश्रमांतच आनंदानें घ्यावयास सांपडतो. गृहस्थाश्रमांत या सुखांचा उपभोग मिळतो एवढेंच नव्हे, तर गृहस्थाश्रमाचा स्वीकार केल्याखेरीज मनुष्याची मानसिक व नैतिक उन्नतिहि व्हावयाची नाहीं. गृहस्थाश्रम ही उन्नतिपथांतील एक मोठी व महत्वाची पायरी आहे. ही पायरी चांगल्या रीतीनें चढण्यास सद्गुणांची विशेष जरूर असते. सुनीतीनें वागण्यास अथवा सद्गुण संपादन करण्यास गृहस्थाश्रमासारखा काळ नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. **फार तर काय पण ब्रह्मचर्यव्रत पाळण्याचादेखील योग्य समय ह्मटला ह्मणजे गृहस्थाश्रम स्वीकारल्या नंतरचाच होय.** ब्रह्मचर्यव्रताला सुरवात बाळपणीं होते ही गोष्ट खरी; तथापि त्याचे कडक नियम व त्याचीं अवश्यक कर्तव्यें हीं गृहस्थाश्रमांतच पाळिलीं पाहिजेत; व असें झालें तरच राष्ट्रीय दृष्टीनें आमचा भाग्योदय होण्याचा आशातंतु कायम राहील.

असो. या वरील दिशेनें भावी प्रजेची खबरदारी व काळजी घेतां येईल. पण प्रस्तुत आमच्यासारख्यांची वाट काय, त्यांनीं वागावें कसें

आणि करावें काय याकडे आपण आतां वळूं. हल्लींचा ब्रह्मचर्याश्रम ह्मणजे निव्वळ फार्स होय व गृहस्थाश्रमाविषयींहि सामान्य लोकांची तर राहोच पण सुशिक्षितवर्गाचीहि बरीच गैर समजूत झालेली दिसते. लोकांच्याठायींचा अंध विश्वास अद्यापि गेलेला नाहीं. वैवाहिक स्थितींत जो स्त्रीपुरुषसंबंध जडतो त्यासंबंधीं मुळाशींच विपरीत ग्रहाचें प्राबल्य दृष्टीस पडतें. तेव्हां ज्यांनीं नुकताच गृहस्थाश्रमांत प्रवेश केला आहे अथवा करण्याचा ज्यांचा समय येऊन ठेपला आहे, अशा तरुण जनानीं वेळींच सावध व्हावें अशा हेतूनें सूचनार्थ दोन शब्द सांगणें अस्थानीं होईल असें वाटत नाहीं. स्त्रीपुरुषसंयोगाचा विषय इतका महत्वाचा आहे, त्या कर्माबरोबच येणारी जबाबदारी इतकी विस्तृत आहे, व मिथ्या शिष्टतेचें स्तोम माजल्यामुळें तो इतका मलीन झाला आहे कीं त्या विषयास लोकांच्या नजरेपुढें आणून त्याला कितीहि महत्व दिलें तरी तें थोडेंच होणार आहे. गृहस्थाश्रमांत प्रवेश करणारीं स्त्रीपुरुषें पूर्व तयारी आणि पूर्व शिक्षण यांपैकीं कांहींच सामुग्री जवळ नसतां स्त्रीपुरुषसमागमांत जितका चटकन प्रवेश करतात तितका प्रवेश त्यांचे हातून संसारांतील अन्य कोणत्याहि कार्यांत क्वचित्च होत असेल. येथें पूर्वींची तयारी ह्मणजे ब्रह्मचर्याश्रमांत पवित्राचरणानें वीर्याचें यथा-सांग रक्षण करणें, अर्थात् प्रजोत्पादनसामर्थ्य अंगीं पूर्णपणें आणणें, सर्व शरीर लोहासारखें कणखर बनवून सर्वावयव परिपक्व करणें, मन निर्मलतेनें, शांततेनें आणि सुविचारानें अलंकृत करणें इत्यादि गोष्टी होत. आणि पूर्व शिक्षण ह्मणजे हे वरील हेतु सफल होण्यास अवश्य पाळावे लागणाऱ्या नियमांचा परिचय होय. ब्रह्मचर्यसमाप्तीनंतर गृहस्थाश्रमदीक्षा घेण्याचा काल वैद्यशास्त्रदृष्ट्या पाहतां स्त्रीनें सोळा वर्षांनंतर व पुरुषानें वीस वर्षांनंतरचाच ठरलेला आहे, असें दिसून येतें.

> पूर्णषोडषवर्षा स्त्री पूर्णविंशेन संगता ।
> शुद्धे गर्भाशये मार्गे रक्ते शुक्रेऽनिले हृदि ॥
> वीर्यवन्तं सुतं सूते तयोर्न्यूनाब्दयोः पुनः ।
> रोग्यल्पायुरधन्यो वा गर्भो भवति नैव वा ॥
> ( वाग्भट-शारीरस्थान-अ० १ ).

याचा भावार्थ एवढाच कीं, सोळा वर्षांच्या आंतील स्त्रीचें गर्भाधान होणें हें तिजला व तिच्या संततीलाहि अनिष्ट आहे. तसेंच वीस वर्षांच्या आंतील वयाच्या पुरुषानें स्त्रीसमागमास प्रवृत्त होणें हेंहि हानिकारक आहे. पण आजमित्तीला विवाहासंबंधीं लोकांच्या अशा कांहीं विलक्षण समजुती होऊन गेल्या आहेत कीं, त्यांचें खरोखर हंसूं येतें. कित्येकांचें तर असें ह्मणणें असतें कीं कसेंतरी आपल्या डोळ्या-देखत आपल्या मुलामुलींचीं लग्नें उरकून घेऊन चार सुना घरांत आणून ठेविल्या ह्मणजे एकदांचें जिंकलें. पण मुलामुलींच्या शरीराची वाढ पूर्णपणें झाली आहे किंवा नाहीं याचा विचार करतो कोण? विवाह ठोकण्याशीं गांठ. ही गांठ मातापितर चार दिवसांत बांधून देतात हें खरें पण ती मुलामुलींची जन्माची गांठ पडते. तेव्हां अशी गांठ घालून देण्यापूर्वीं कांहीं महत्वाच्या गोष्टींचा विचार करण्याची पालकांच्या शिरावरची एक मोठी जबाबदारी असते, त्यांतून ते जर मुक्त होतील, तर त्यांच्या चार दिवसांच्या आनंदापेक्षां जन्माची गांठ ज्यांची पडणार त्यांचा आनंद सहस्रपटीनें अधिक होईल यांत संशय नाहीं. सारांश, आपल्या शरीराची वाढ पूर्ण होईपावेतों, कोणत्याही स्त्रीपुरुषानें विवाहाचे भरीस पडूं नये, हें अधिक चांगलें. ( येथें विवाह या शब्दाचा अर्थ घ्यावयाचा तो असा कीं, ब्रह्मचर्यसमाप्तीनंतर गृहस्थाश्रमांत प्रवेश केल्यावर स्त्रीपुरुषसमागमाला जी सवलत मिळते ती.) साधारणपणें जे नियम पशुपक्ष्यादिकांत पाळिले जातात, त्या नियमांचेंहि उल्लंघन मानवी वर्गांत दृष्टीस पडते. गोपाल ( जनावरांचे कळप राखणारे ) आपलीं जनावरें प्रजोत्पत्तीस योग्यपणें तयार व्हावींत एतदर्थ अत्यंत काळजी घेत असतात. जनावरांचे जोडप्यांतील योग्यायोग्यतेचा विचार करून त्यांच्या सहचरांची ते निवडणूक करितात. शरीरसौष्ठव जेणेंकरून वृद्धिंगत होईल अशा आहाराची ते योजना करितात व नरमादीपैकीं कोणीहि थकलेला अथवा व्याधिग्रस्त असूं नये, एतदर्थ ते काळजी वाहत असतात. मग मानवीवर्गानें स्वतःचे बाबतींतच एवढी अनास्था कां दाखवावी याचें कारण समजत नाहीं; किंवा मनुष्य मी

चैतन्यविशिष्ट सृष्टींतील मुकुटमणि व ज्ञान, विचारणाशक्ति आणि दूर-दर्शित्व या गुणांनीं विशिष्ट असा प्राणी आहे, या घमेंडीनेंच वाया जात नसेल कशावरून? अथवा त्याचें आपले अपत्यांवरील प्रेम पशुपक्ष्या-दिकांचे ठायीं व्यक्त होणाऱ्या प्रेमाहून कमी असतें, म्हणून आपल्या बलाबलाचा विचार न करितां मनुष्य स्त्रीसमागमास प्रवृत्त होऊन विषयो-पभोगाच्या अतिरेकाचा विपत्तिजनक परिणाम म्हणून आपली प्रजा लंगडी, खुळी, व्याधिग्रस्त आणि कुरूप अशी निर्माण होऊं देत आहे काय? खरोखर ही उपेक्षा म्हणजे स्त्रीपुरुषास व तरुण मुलामुलींस सारखीच अत्यंत लाजिरवाणी व अधोगतीस नेणारी आहे. ह्या दिशेनें जें बेसावधपणानें आपल्या हातून कार्य घडत आहे, त्याचे जे दुष्परिणाम निरंतर भोगावे लागत आहेत, त्यांची योग्य कल्पना तरी आपणाला येते काय? कार्य-कारणभावाचे नियम सजीव आणि निर्जीव सृष्टीला सारखेच लागू आहेत. सृष्टीचे नियम कधीं न ढळणारे व शाश्वतच आहेत. तिचें रहस्य मात्र सहसा कोणास कळत नाहीं. पण तिच्या नियमांचें उल्लंघन अथवा त्यांची अवहेलना करणाऱ्यास सृष्टी कधींहि क्षमा करीत नाहीं. ज्याप्रमाणें सत्कर्म हें कधीं वाया जात नसतें, म्हणजे त्याचें मधुर फल केव्हां ना केव्हां तरी चाखावयास सांपडतेंच सांपडतें, तद्वत्‌च दुष्कर्माचें कटु फल भोगल्यावांचून गत्यंतरच नसतें. हें म्हणणें मुळींच अतिशयोक्तीचें नाहीं. तर हें म्हणणें सुविख्यात डाक्तरांनीं अनेकदां याहून किती तरी उत्कृष्ट भाषेनें मंडित केलें आहे. ज्यांच्या अंगीं पितृदशा आली आहे अथवा ज्यांच्या ठिकाणीं ती अद्याप यावयाची आहे त्या सर्वांना ही गोष्ट सारखीच कल्याणप्रद आहे. उत्क्रांति-तत्त्ववाद्यांच्या दृष्टीनेंहि तिचा आपणाला निषेध करितां येत नाहीं. समाजव्यवस्थापकांच्या दृष्टीनें तर या विषयाकडे आस्थापूर्वक आणि खरें लक्ष पोंहोंचविणें भाग पडते; महर्षींचे वंशज आणि लोकसंग्रहार्थ कार्यकारी मंडळी अथवा कृतीनें जनहितेच्छा दाखविणाऱ्यांच्या दृष्टीनें पाहिलें तर या विषयाचें यथार्थ ज्ञान सामान्यजनतेला करून देणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.

असो. या विषयाचा ऊहापोह जेवढा नीतिशास्त्रदृष्टच्या करितां येईल तितकाच येथें कर्तव्य आहे. स्त्रीपुरुषांच्या जननेंद्रियांचें सविस्तर वर्णन करण्याचा प्रयत्न करणें ह्मणजे अंगीं अधिकार नसून इंद्रियविज्ञान-शास्त्राचा उपमर्द करण्यासारखें होय. ज्यांना त्याचें रहस्य कळावें अशी जिज्ञासा असेल त्यांच्याकरितां शारीरशास्त्र आणि इंद्रियविज्ञान-शास्त्र यावर उत्कृष्ट ग्रंथ आहेत ते त्यानीं समग्र वाचून पाहावेत. येथें एवढें सांगितलें ह्मणजे बस्स होईल कीं संयोगकर्माचा प्रधान हेतु ह्मटला ह्मणजे पुरुषाच्या शुक्रापासून स्त्रीच्या गर्भाशयांत गर्भधारणा होणें हा होय. शुक्रपरमाणूंच्यासंबंधीं एक गोष्ट येथें वाचकांच्या नजरेस आणणें अवश्य वाटतें, ती ही कीं शुक्रपरमाणूंत आणि ज्ञानतंतूंच्या परमाणूंत अत्यंत सादृश्य आहे. दोनीहि सूक्ष्म परमाणूनींच घटित असतात. शुक्र आणि मज्जातत्व या दोहोंत कणरूपद्रव्याचा संचय असतो. शुक्र-द्रवांतील घट्टभाग शुक्रकण व प्रजोत्पादक जंतु ह्यांनीं झालेला असतो. मज्जारसवाहिन्यांच्या क्रिया अनेक दिशेनें चालू असतात, व शुक्र-वाहिनीची क्रिया एकाच दिशेनें असते हाच कायतो त्या दोहोंतील विशेष. शुक्राची उत्पत्ति रक्तांतील शुद्ध सत्वाच्या संचयापासून होते व हेंच पुरुषाच्या रक्तप्रवाहांत पुनः मिळालें असतां त्याचा प्रजोत्पादनाकडे व्यय न होतां ताकद वाढते. स्त्रीपुरुषप्रसंगीं मज्जारस फार खर्ची पडतो. यासंबंधीं अनुभवशीर वैद्यांनी लिहून ठेविलेलीं मतें मनन करण्याजोगीं आहेत.

(अ) ज्याप्रमाणें अश्रांत मानसिक श्रम झाले असतां मज्जारस फार खर्ची पडून मेंदूला क्षीणता उत्पन्न होते, तद्वतच संगातिरेकानें शुक्राचा ( वीर्याचा ) अपव्यय झाला असतां सर्वावयवें कमजोर होऊन प्रकृतींत विलक्षण प्रकारचा चंचलपणा उत्पन्न होतो. शिवाय संगातिरेकानें शरीरांत जे अनेक सांसर्गिक आणि बद्धमूल रोग बिऱ्हाड करतात तें सांगावयासच नको.

( ब ) ज्या उपायांनीं मेंदूला तरतरीतपणा येतो व अंगीं उमेद वाढते त्याच उपायांनीं वीर्य शुद्ध होऊन वृद्धीस पावतें, आणि स्त्रीच्या ठिकाणीं गर्भधारणा होण्यास तें योग्य बनतें.

दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे ती ही कीं, जनावरें खसीं केलीं ह्मणजे तीं इतर जनावरांहून लाजाळू आणि भित्रीं होतात व त्यांचे अंगीं सहनशीलता कमी असते असा नियम आहे. या सर्वांचा एकत्र विचार केला असतां दोन ठोकळ सिद्धांत निघतात ते असे कीं:—

१. मज्जातंतूचा आणि शुक्राचा प्रत्यक्ष आणि अत्यंत निकट संबंध आहे.
२. शुक्रपरमाणू आणि ज्ञानतंतूचे परमाणू हे दोनी समान जरी नसले तरी पहिला दुसऱ्याचे प्राथमिक अथवा अपूर्ण रूप आहे हें खास.

नीच कोटींतील पशूंच्या ठिकाणीं स्त्रीपुरुषसंयोगासंबंधीं आपल्या नजरेस ज्या गोष्टी येतात त्या अशा. ( १ ) मनुष्यें जर जनावरांच्या वाटेस गेलीं नाहींत तर शरीराची वाढ पूर्णपणें होऊन तें चांगलें सुदृढ व निरोगी बनून अंगीं प्रजोत्पादनसामर्थ्य पूर्णपणें येईपर्यंत तीं समागमसुखास प्रवृत्त होत नाहींत. ( २ ) अंडपेशींतून * अंडें नुकतेंच बाहेर पडून गर्भ धारणास योग्य असतें त्या समयासच मादी संभोगासाठीं नरास जवळ येऊं देते. शिवाय याहून उच्च कोटींतील पशूंच्या ठिकाणीं तर गर्भधारणार्थ संभोगक्रिया काय ती वर्षांतून एकदांच

---

* स्त्रीजातीच्या गर्भाशयाचे दक्षिणोत्तर बाजूस एकेक मिळून दोन अंडाशय असतात. ह्या अन्तःफुलाची रचना फार दाट व मजबूत असून, त्यांत एक प्रकारच्या विशेष तंतूंचें जाळें आहे, त्या जाळ्यांत अनेक कोश असतात. त्यांस **अंडपेशी** ह्मणतात. ह्या अंडपेशींतून अंडें पक्क होऊन, बाहेर पडूं लागलें ह्मणजे स्त्रियांच्या ठिकाणीं कामवासनेचा उदय होतो.

घडते; कित्येकांच्यांत याहूनहि अधिक काल लोटलेला दृष्टीस पडतो. ( ३ ) गर्भधारणा सफल होण्याकरितां ह्मणजे पूर्ण गर्भधारणा होण्याकरितां उभयतांना नरमादीला पूर्ण संभोगेच्छा एकवार उत्पन्न झालेली बस होते. ( ४ ) एकवार गर्भधारणा झाली ह्मणजे लागलीच मादी नरास जवळदेखील येऊं देत नाहीं मग त्याच्या त्या शृंगारचेष्टातरी ती कोठून चालूं देईल? हें कोठवर, तर वासरांचा जन्म होऊन त्यांना स्तनपान देण्याचा काल संपून जीविततत्व अथवा प्राणसामर्थ्य पुनः पूर्ववत् अंगीं येऊन कामवासना उद्दीपन होईपर्यंत.

हीच गोष्ट वृक्षांच्याहि ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येते. यांच्यांतील स्त्रीतत्वाचा आणि पुरुषतत्वाचा संयोग वायु आणि पंखांचीं कीटकें हीं घडवून आणतात. खनिज पदार्थांच्या संबंधानेंहि रसायनशास्त्रानें ही गोष्ट आपल्या नजरेस आणून दिली आहे कीं दोन पदार्थांच्या संयोगापासून तिसरा पदार्थ उत्पन्न झालाच पाहिजे. तेंहि कांहीं निश्चित आणि अनुकूल परिस्थितींतच असले संयोग घडवून आणणें शक्य असतें, एरवीं ते साधत नाहींत, व ज्या दोन पदार्थांचा संयोग कर्तव्य असेल त्या दोन पदार्थांत परस्परांचे ठिकाणीं परस्परांना एकमेकाकडे आकर्षून घेण्याचें बल असलेंच पाहिजे.

सारांश कनिष्ठ सृष्टींत जेवढा कांहीं पुरावा मिळण्याजोगा आहे तेवढ्या पुराव्यावरून एक गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते कीं पूर्ण संभोगाचा उपयोग केवळ उपजाति निर्माण होण्या करितांच करण्यांत येतो. या व्यतिरिक्त संभोग करणें ह्मणजे नियम आणि स्वभाव यांना अननुरूप असें कर्म करणें होय. पण या गोष्टीसंबंधीं मानवी वर्गांत केवढें अज्ञानतिमिर वास करीत आहे! मनुष्याच्या ठिकाणीं दोन प्रकारच्या प्रवृत्ती असतात. एक नीच प्रवृत्ति व दुसरी उच्च प्रवृत्ति, व ही गोष्ट शास्त्रज्ञ आणि धर्मज्ञ या उभयतांना सारखीच मान्य आहे. विधात्यानें मनुष्याला जें उच्चतर असें मानसिक, नैतिक आणि पारमार्थिक स्वरूप दिलें आहे, त्याबरोबरच त्याचें प्रकटीकरण त्याला करतां यावें एतदर्थ

त्याची ऐंद्रिय रचनाहि सर्वांहून श्रेष्ठ आणि विस्तृत अशी तयार केली आहे. उत्क्रांतिमार्गांत मनुष्याचें पाऊल जसजसें पुढें पडतें तसतसा त्याच्या दिव्यस्वरूपाच्या उच्चतर संभाव्यतेचा अरुणोदय होऊन तो धिमेपणानें पुढें सरसावित असतो; आणि त्याच्या नीच आणि पशु-तुल्य स्वभावांत फरक पडून त्याची सुधारणा होते, ह्मणजे दिव्यस्वरू-पाच्या सान्निध्यानें त्याच्या अंगच्या पशुशीलास शोभणाऱ्या गुणधर्मांचा क्रमशः नाश होतो. उत्क्रांतितत्व मानवीवर्गाकरितां जें कांहीं कार्य करीत आहे तें हेंच. उत्क्रांतिवादी आपणास आणखी असेंहि सांगतात कीं उत्क्रांतीच्या या सामान्य यात्रेंत आपल्या आर्यलोकांनीं बरीच आघाडी मारली आहे. सारांश उच्चकोटींतील पशूहून मानवीवर्ग हा कितीतरीपटीनें श्रेष्ठ ठरतो; अधिक उच्चप्रतीचे स्वातंत्र्यसुखाचा उप-भोग मनुष्यालाच घेतां येतो; अत्यंत श्रेष्ठप्रतीचें मानसिक, नैतिक, आणि पारमार्थिक सामर्थ्यहि त्याच्याच अंगीं आहे. व असें जर आहे तर उच्चस्थितीप्रत संक्रमण पावलेल्या मानवीप्राण्याच्या आणि पशूंच्या स्त्रीपुरुषसंयोगकर्मांत तत्वतः फरक अवश्यमेव असलाच पाहिजे ही गोष्ट निर्विवाद आहे. मनुष्य जर आपल्या स्वभावाला अनुसरून वर्तन करूं लागला ह्मणजे आपल्या अंतर्यामीच्या सदसद्विवेकबुद्धीच्या सोज्ज्वल प्रकाशांत विवेकानें चालूं लागला तर त्याच्या नजरेस असें येईल कीं गतानुगतिकत्वाचा-वंशपरंपरेचा नियम आपल्या भावी प्रजेच्या केवळ शारीरिकस्वरूपालाच लागू पडतो असें नाहीं तर त्यांच्या मानसिक आणि नैतिक स्वरूपालाहि तो नियम सारखाच लागू पडतो; ह्मणजे माता-पितर हे आपल्या प्रजेच्या नुसत्या शरीराचेच जन्मदाते असतात असें नव्हे, तर आपल्या अंगचे मानसिक आणि नैतिकगुणहि ते आपल्या मुलांस जन्मतःच देत असतात. व ही गोष्ट मनुष्याला कळत नाहीं असें नाहीं. कारण यःकश्चित गुरांचा कळप राखणाराच्या नात्यानें जेव्हां तो आपल्या गुरांची मैथुनकर्माचे बाबतींत काळजी घेत असतो तेव्हां त्याला ह्या सर्व गोष्टी अवगत असतात. मातेच्या अंगच्या इच्छासामर्थ्याचा अथवा कल्पनासामर्थ्याचा परिणाम तिची प्रजा

वरी वाईट निपजण्यावर केवढा होतो हें त्याला ठाऊक असतें. कारण गर्भधारण झाल्यानंतर लागलीच मादीला तिच्याच जातीचा उत्कृष्ट प्राणी तिच्या नजरेस पडावा ह्मणून तो खबरदारी घेत असतो. भावी जनावरांच्या शारीरिक बाबतींतच एवढी काळजी घेण्यांत येते असें नाहीं तर त्यांच्या मानसिक आणि नैतिक बाबतींतही त्यांचें लक्ष सारखेंच असतें; आणि ह्मणूनच आज बाजारांत जातिवंत जनावरांना इतकी किंमत पडत आहे. हा वंशपरंपरेचा नियम जसा पशूंना तसाच मनुष्यांनाही तो सारखाच लागू आहे. मातापितराप्रमाणेंच मुलेंहि निपजावींत हा अगदीं सामान्य नियम आहे. मातापितरें जर शरीरानें नाजूक असलीं, तर मुलेंहि नाजुकच निपजतात. आईबाप रोगी असल्यास मुलांच्या ठिकाणींहि विशिष्ट प्रकारच्या रोगाची पूर्वप्रवृत्ति नजरेस येते; आईबाप जर कुरूप असले, तर प्रजाहि कुरूपच; तसेंच जेथें मातापितरांचीं शरीरें सुदृढ व सतेज तेथें त्यांची प्रजाहि त्यांच्यासारखीच दांडगी व तेजःपुंज निर्माण होते. मानसिक आणि नैतिक गुणधर्मांचे बाबतींत हाच नियम लागू पडतो. पराक्रम, सदाचार, औदार्य इत्यादि सद्गुण आणि निर्दयता, साहसिकता, विषयलंपटता, इत्यादि दुर्गुण मातापितरांपासूनच मुलांच्या ठिकाणीं संक्रमित होतात, याविषयीं अनेक उदाहरणें आढळतात. प्रसंगविशेषीं घराण्यांतील दोन चार पिढीमागल्या पूर्वजांप्रमाणें कधीं कधीं मुलें निपजतात; हें खेरीजकरून पाहिलें तर असें निष्पन्न होतें कीं, आईबापाहून शरीरानें आणि लक्षणांनीं वेगळी अशी प्रजा निपजणें ह्याचें कारण आईबापाच्या हातून स्त्रीपुरुषसंयोगाचे बाबतींत झालेलें सृष्टिनियमांचें उल्लंघन हेंच होय.

असो. ह्या वरील सर्व गोष्टींवरून स्त्रीपुरुषसमागमाचे बाबतींत आपणाला काय बोध घेतां येतो हें पाहूं.

१. प्रथमतः एक ठळक गोष्ट आपल्या नजरेस येते ती अशी कीं, सृष्टींत कोणतेंही कार्य बंद पडत नाहीं अथवा एकदम सुरू होत नाहीं. सृष्टीचे नियम नित्य आहेत व त्या नियमानुसार सृष्टींत

घडामोडी होत असतात. उत्क्रांतीचें पाऊल जसजसें पुढें पडतें, उत्क्रांतीची जसजशी प्रगति होत असते, तसतसा सृष्टिरूपी प्राण्यांच्या नानाविध व्यापारांचा इतर विशिष्ट कार्याकडे विनियोग होत असतो, व संभोगक्रिया या नियमास अपवाद आहे असें नाहीं. खनिज कोटींतील या कार्याच्या मुळाशीं जे कार्यकारी नियम आहेत ते व वनस्पति-कोटींतील अथवा प्राणिकोटींतील अत्युच्च व्यक्तीला ह्या कार्याला लागू असणारे नियम ह्यांच्यांत तत्वतः मुळींच भेद नाहीं. खनिजकोटी-पासून तों प्राणिकोटीपर्यंत पाहिलें तर खनिजकोटीपेक्षां प्राणिकोटीस आपल्या व्यापारांचा ( शक्तीचा ) विनियोग इतर विशिष्ट कार्याकडे फार करावा लागतो. तथापि दोन्ही कोटींतील स्त्रीपुरुषसमागमाचे नियम अगदीं बहुतेक सारखे आहेत. व ही जर वस्तुस्थिति आहे तर आमची शरीररचना फार उत्तम आणि त्या रचनेला अनुरूप असाच विशिष्ट कार्ये करण्याकडे शरीराच्या व्यापारांचा ( शक्तीचा ) होणारा विनियोग फार अवाढव्य आहे; ह्मणून मनुष्येतर कोटींतील स्त्रीपुरुषसमागमाचे नियम आह्माला लागू नाहींत असें मानवी वर्गाकडून कां मानण्यांत यावें याचें खरोखर कारण कांहींच समजत नाहीं. जर आपली शरीररचना फार चांगल्या प्रकारची आहे तर त्याप्रमाणें आपल्या उन्नतीकरितां मानसिक, नैतिक, आणि धार्मिक अशीं क्षेत्रेंहि अनेक आहेत; आणि यामुळें त्यांचा व्यापार अव्याहत चालू आहे. मनुष्य स्त्रीसमागमाचे बाबतींत प्रत्यहीं जें महत्पाप करीत आहे तें न्याय्य असें ह्मणावयास त्याचे जननेंद्रियालाहि सर्वतोपरि परिपक्वदशा प्राप्त झालेली असते असें मुळींच नसतें. उलटें या बाबतींत त्याची पशु-वर्गाशीं जर तुलना केली तर त्याचें जननेंद्रियसामर्थ्य अगदीं अल्प-प्रमाणावर आहे असें दृष्टोत्पत्तीस येतें. आणि ह्मणूनच मनुष्यानें आपला स्त्रीसंग अत्युच्च कोटींतील पशूंच्या व्यापाराहूनहि फारच कमी प्रमाणानें चालविला पाहिजे हें सिद्ध होत नाहीं काय?

२. सृष्टींत ' गतानुगतिकत्वाचा ' अथवा वंशपरंपरेचा नियम जर खरा आहे, आणि त्या नियमानुसार मानसिक आणि नैतिक प्रदेशांत व्यापार घडत आहेत अर्थात् पूर्वजांच्या मानसिक आणि नैतिक गुण-कर्मांचा परिणाम जर त्यांच्या पिढीवर होत आहे, तर ज्या वयांत अथवा स्थितींत स्त्रीपुरुषांचे मानसिक, नैतिक, आणि शारीरिक गुण-धर्मांचा पूर्णपणें विकास झालेला नसतो अथवा स्वभावाला वयपरत्वें परिपक्वता येऊन जी सुस्थिति लाभावयाची ती लाभलेली नसते, अशा वयांत उभयतांनीं समागमाला प्रवृत्त होणें ह्मणजे सृष्टिनियमाविरुद्ध आचरण आणि पाप करणें नव्हे काय?

३. धर्मानुसार आणि खऱ्या उद्देशाकडे दृष्टी पोंहचवून जर मनुष्याच्या हातून कार्याचरण घडलें तर तें आनंदजनक आणि उपयुक्त होऊन त्यापासून शरीरेंद्रियांना सुख प्राप्त होतें, हेंच तत्व स्त्रीपुरुष-संगासहि लागू आहे.

मनुष्याचें आचरण जर आपल्या प्रकृतीस किंवा स्वभावास इष्ट असेंच असतें तर त्यानें हा बोध समजाऊन घेतला असता, त्याप्रमाणें आचरण केलें असतें, आणि सदैव सुख मिळविलें असतें. परंतु हाय! हाय! त्याच्या प्रकृतींत—स्वभावांत—किती अंतर! त्यापासून तो पराङ्मुख आहे! विषयांध झाला आहे! विषयासक्तीचें घनपटल आज हजारों वर्षे त्याच्या डोळ्यावर आहे, आणि ह्मणून ' संभोगक्रियेचा उद्देश केवळ उपजाति निर्माण करणें हाच आहे ' हें सोज्ज्वल तत्व पुढें ठेविल्याबरोबर त्याचे डोळे दिपून जातात; परंतु त्याचे डोळे दिपले तरी सृष्टीचे दिपत नाहींत. सृष्टीला खऱ्या प्रेमळ मातेची उपमा आहे. ती त्याच्या विषयांधपणाचा परिणाम ह्मणून रोगग्रस्त, कुरूप, अल्पायुषी आणि दुर्बळ अशा संततीच्या रूपाचा कटुरसानें भरलेला प्याला त्याला पिण्यास भाग पाडते, व अशा पोरांची पिरपीर कशी मिटवावी हें त्याला मोठें कोडें पडतें.

सारांश, अनियमित शृंगारोपभोग घेणाराची संततीच अशी निपजते असें नाहीं. तर त्याला स्वतःलाहि शारीरिक व्याधी बऱ्याच भोगाव्या लागतात. त्याच्या अखिल इंद्रियांना मंदत्व येऊन मेंदूचे घटकावयव बिघडतात व अखेरीस अनिश्चय आणि मानसिक दौर्बल्य प्राप्त होऊन, नीति लयास जाते व आत्मा भ्रष्ट होतो. तेव्हां मातापितरांनीं ह्या वरील गोष्टींचा नीट विचार करून आपला विषयांधपणा घालवून टाकणें श्रेयस्कर नव्हे काय? ह्या गोष्टींच्या मननानें मातापितरांनीं आपापली योग्य जबाबदारी ओळखणें हितावह नाहीं काय? आपलें घर थोड्याच कां होईना पण सुदृढ, निरोगी, सौंदर्यवान्, बुद्धिमान् आणि थोर अशा मुलाबाळांनीं भरून त्याला खऱ्या नंदनवनाची शोभा आणणें हें आपल्या स्वाधीन आहे हें प्रत्येकानें जाणलें पाहिजे. अशा मुलांच्या साधारण गरजा पुरविणें हें हें काम बिलकुल कठीण नसतें. पण तेंच मातापितरांच्या अमर्याद कामाचाराचा दुष्परिणाम ह्मणून जी खुजी, खुरटी, आणि रोगट प्रजा निपजते त्यांची खस्त काढतां काढतां त्यांच्या मातापितरांना बेजार व्हावें लागतें. त्यांच्या आरोग्यासाठीं वैद्याचे घराचे उंबरठे झिजवितां झिजवितां ते अगदीं जेरीस येतात.

हा कौटुंबीय दृष्टीचा विचार घटकाभर बाजूला ठेवून सामाजिक दृष्टीनें समाजावर त्याचा काय परिणाम होतो, हें आपण पाहूं. सामाजिक दृष्टीनें पाहतां मातापितरांच्या शिरावर कुटुंबांतील जबाबदारीहून अधिक मोठ्या प्रकारची जबाबदारी असल्याचें दिसून येतें. व ती कोणती आणि कां याचा मातापितरांनींच विचार केल्यास अधिक बरें. ज्या समाजांत मातापितरांना रहावयाचें असतें, त्या समाजानेंच त्यांच्यावर एक कामगिरी सोपविलेली आहे असें मानावयाचें असतें. ती कामगिरी ह्मणजे हीच कीं, ते समाज सुरळीत चालण्याकरितां त्याच्या अवयवांत अधिक योग्य अवयवांची भरती घालणें. पण त्याच समाजांत जर अशक्त, पापी, मूर्ख आणि अमर्याद कामाचरण करणाऱ्या मंडळीची भर पडली तर मातापितर आपल्या जबाबदारींतून मोकळे झाले असें



कधींतरी होईल काय? उलटें सदसद्विवेकबुद्धीशीं विश्वासघातकीपणा केल्याचा आरोप मात्र त्यांचे माथीं येईल, व असल्या ह्या पोंचट नूतन मंडळीनें समाजशक्तींत कोणत्याहि प्रकारची भर न पडतां ती सामाजिक संपत्तीच्या नाशास मात्र कारणीभूत होते; कारण असल्यांच्या जोपासनेकरितांच समाजाला कितीतरी परिश्रम करावे लागतात. अन्नास मोताद झालेल्या लोकांकरितां रिलीफ फंड उभारावे लागतात; इस्पितळें, कारागृहें, वेड्यांचीं इस्पितळें, अज्ञान अपराधी मुलांस सद्वर्तनास लावणाऱ्या संस्था इत्यादि तयार कराव्या लागतात; दिवाणी आणि फौजदारी कोर्टें स्थापन करावीं लागतात; सार्वजनिक शांततेच्या आणि मालाच्या संरक्षणार्थ पोलीस आणि इतर संस्था स्थापन कराव्या लागतात. मानवी गुणांचा उत्कर्ष करणें हाच जिचा उद्देश अशा उत्क्रांतीच्या दृष्टीनेंही पाहिलें असतां लोकांनीं जर अशाच अविचारानें हें जग विद्रूप, खुजी, नीतिभ्रष्ट अशा मासलेवाईक प्रजेनें भरून काढिलें तर आपल्या भावी शोचनीय स्थितीची अटकळ आपणास सहज करितां येईल. **विष्णुपुराणांत** एके ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं कलियुगाच्या मध्यकालीं सर्वांत वृद्ध आजोबाचें वय ह्मटलें ह्मणजे अवघें २३ वर्षांचें राहणार; व जर आमच्यांत इष्ट ती सुधारणा झाली •ाहीं, वस्तुस्थिति आहे तशीच जर कायम राहिली तर हें वरील भाकित कांहीं अंशानें तरी खरें ठरेल, हें दाखविण्यास आजहि आमच्याजवळ दुर्गुणांचा आणि दुश्चिन्हांचा अभाव आहे असें नाहीं. ज्यांच्यापासून जनहितैषी लोकांना अखंड त्रास भोगावा लागत आहे अशा ह्या सामाजिक प्रश्नांच्या उद्भवाचें मुख्य कारण ह्मटलें ह्मणजे मातापितरांचें अविचारीपणाचें कामाचरण हेंच होय. सारांश, ही बाब अत्यंत महत्वाची आहे. निदान आपणांपैकीं बहुतेकांना वाटत आहे त्यापेक्षां तरी ती पुष्कळ अधिक महत्वाची आहे. मातापितरांनीं या विषयाचा विचार अंतःकरणपूर्वक करावा अशी लेखकाची मनापासून इच्छा आहे.

येथें कदाचित् वाचकवर्गाकडून असा आक्षेप घेण्यांत येईल कीं, आज तरुणपिढींत व्यक्त दिसून येणारी बालप्रौढी व विषयोपभोगाचा भीतिप्रद

अतिरेक ह्या गोष्टींचा परिचय असूनहि असा उपदेश कसा करित येईल? तरुणपिढीच्या ठिकाणीं कामवासनेचा उदय असतां ती वासना परिपूर्ण करण्याकरितां कायदेशीर रीतीनें वेळींच योग्य तरतूद करून न दिली तर त्यांना ज्या चिळस येणाऱ्या घातुक संवयी जडतात तिकडे तुमच्यानें डोळेझांक कशी करवेल? आणि अशा स्थितींत त्यांना ह्या विषयासंबंधीं कडक व्रत आचरण्यास कसें सांगतां? अशा प्रकारचें आत्मदमन ज्यानें केलें आहे असें एखादें उदाहरण मानव इतिहासांत दाखविण्यास तुमच्याजवळ आहे काय? हा शेवटचा प्रश्न खेरीज-करून बाकीच्या सर्व प्रश्नांना उत्तर द्यावयाचें ह्मणजे एवढेंच सांगावयाचें कीं केवळ ह्या वरील गोष्टींचेंच विवेचन (पूर्णपणें) अनेकवार झालें आहे, इतकेंच नव्हे, तर त्या प्रश्नाशीं संबंध असणाऱ्या इतर अनेक गोष्टींचाहि त्याबरोबर विचार झाला आहे व केवळ पश्वादिकांमध्यें आढळून येणाऱ्या आत्मदमनाचाच अंगिकार करण्याचा उपदेश बुद्धिपुर-स्सर मी करीत आहें असें नाहीं, तर त्याहूनही श्रेष्ठ आणि मानव-थोरवीला साजेल असें आत्मदमन हवें आहे. पण आजच्या कालाला अशा प्रकारचें कडकडीत आत्मदमन पाळिलें जाण्याची आशा स्वप्नांत-देखील मनांत उत्पन्न व्हावयाची नाहीं हें स्पष्टपणें लक्षांत ठेविलें पाहिजे. तथापि एवढ्याच कारणावरून अशा प्रकारचा पुरुषार्थ अथवा ही उदात्त कल्पना नेहमीं दृष्टीसमोर ठेऊन तत्सिध्यर्थ अहर्निश होईल तितका प्रयत्न करण्यास एखाद्यानें माघार घेतल्यास तें केव्हांही उचित होणार नाहीं. त्या दिशेनें प्रत्येकानें खऱ्या मनोभावानें प्रयत्न करणें एवढीच गोष्ट आज हवी आहे. हा प्रयत्न करण्यास वास्तविक गोष्टी कोणत्या पाळावयाच्या त्या पुढें ओघानें सांगण्यांत येतीलच.

सध्या या वरील विधानास कांहीं ऐतिहासिक पुरावा आहे काय हें पाहण्याकरितां अर्वाचीन जगाच्या इतिहासाचें पर्यालोचन करणें ह्मणजे निवळ वाळूची इमारत उभारण्यासारखेंच निरर्थक होईल. पण अर्वा-चीन कालांतहि ह्मणजे जेव्हां देशाची स्थिति अनिश्चित व अस्थिर अशी

होती, जेव्हां लोकांना आपल्या जीवितवित्ताचें संरक्षण तरवारीच्या जोरावर करावें लागत होतें, तेव्हां वैवाहिक स्थितीचा अनुभव घेण्याचे प्रसंग फार क्वचित् होते. शिवाय गुप्तकारस्थानें आणि आपआपसांतील तंटे ह्यांनीं त्याकालच्या लोकांचीं मनें इतकीं कांहीं वेधून टाकिलीं होतीं कीं त्यांना अनियंत्रित विषयोपभोगांत निमग्न होण्यास यत्किंचित्हि उत्साह नसे अथवा फुरसद होत नसे. अशाप्रकारची विषयनिमग्नता ह्मणजे नेहमीं मानसिक आणि शारीरिक आलस्याचाच परिणाम होय. एवंच त्याकालीं मनुष्याच्या कामवासनेवर देशांतील क्षुब्ध स्थितीचा कांहीं अंशीं दाब होता. हल्लीं अशा दाबांचा पत्ताहि नाहीं. धर्मबंधनानींहि त्याकालीं लोकांना ह्या बाबतींत बरेंच आवरून धरिलें होतें; तीं बंधनें आज एकीकडे अविश्वास आणि दुसरीकडे धर्मभोळे-पणा माजल्यामुळें शिथिल झालीं आहेत. तेव्हां अशा स्थितींत आह्मा-लोकांची विषयवृत्ति उच्छृंखल होत जावी यांत नवल तें कोणतें? पण अति प्राचीनकालीं ह्मणजे **मनूला** जेव्हां सर्वत्र मान मिळत होता व त्याच्या आज्ञा सर्वजण पाळित होते, तेव्हां वरील प्रकारचें इंद्रियदमन शास्त्रसंमत ह्मणून करीत होते असें दिसतें; निदान समाजांतील उच्च-प्रतीच्या वर्गाकडूनतरी तें करण्यांत येत होतें हें खचित. पण आज वस्तुस्थिति जरी तशी नाहीं तरी हा पूर्व सांप्रदाय आणि ही उदात्त कल्पना आह्मांतून नष्ट झालीं आहेत असें नाहीं. मात्र त्याकरितां आह्मीं आपलें प्राचीन ग्रंथभांडार अवलोकन केलें पाहिजे. उदाहरणार्थ '**प्रजायै गृहमेधिनाम**' रघुकुलोत्पन्न पुरुषांनीं केवळ प्रजोत्पादनार्थच विवाह केले, ह्या अगदीं अलीकडील काळांतील **कालीदासो**क्तीवरून-देखील वरील कल्पना दृढ होते.

स्वायंभू **मनूची** कन्या **देवहूती** हिचें महामुनी **कर्दमाशीं** झालेल्या विवाहाचें जें वर्णन भागवतांत आहे त्यावरूनहि वरील कल्पनेला पुष्टी येते. आपला वैवाहिक संबंध कर्दमऋषीशीं जडावा अशी प्रबल इच्छा देवहूतीनें प्रदर्शित केल्यावरून स्वायंभू मनूनें तिला कर्दमऋषीपाशीं

नेऊन तिचा त्याच्याशीं विवाहसंबंध जुळविला. पण कर्दमाची अट अशी होती कीं संतानोत्पत्ति होईपर्यंतच कायतें विवाहबंधन कायम रहावयाचें. कारण विवाहाचा खरा हेतु जो संतानोत्पत्ति तो सिद्धीस जातांक्षणींच आपणास आश्रमांतर करतां यावें. देवहूतीनें पतिगृहीं बरींच वर्षे व्रताचरणांत आणि पतिसेवेंत दक्ष राहण्यांत घालविल्यानंतर एके दिवशीं जेव्हां कर्दमानें तुझी सेवानिष्ठा पाहून मी अत्यंत संतुष्ट झालों आहे असें तिला दर्शविलें, तेव्हां एकवार संगसुख देऊन लग्नाची सांगता करावी अशी देवहूतीनें कर्दमास विज्ञप्ति केली. या एकवारच्या रतिसुखाचा आनंदजनक परिणाम ह्मणून जें अपत्य निपजलें तें **सांख्य-शास्त्राचा** जनक महान् **कपिलमुनि** हे होत. ऐतिहासिक अथवा पौराणिक भाग घटकाभर बाजूला ठेऊं आणि आपल्या हिंदुसमाजांत विवाहकालीं जो मंत्र ह्मणण्यांत येतो त्याकडे दृष्टी पोंहचवूं. एक लहानसें शाब्दिक सूत्रच आपण घेऊं. त्याला खरोखर मंत्र हें नांवदेखील शोभत नाहीं. पण तेवढ्यानेंच वरील कल्पनेची यथार्थता वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. त्या शाब्दिक सूत्राचा खरा अर्थ विवाहित पुरुषांपैकीं एकाच्यातरी ध्यानांत राहत असेल किंवा नाहीं याचा वानवाच आहे. तें सूत्र येणेंप्रमाणें.

‘—गोत्रोत्पन्नां—शर्मणः पुत्रीं—पौत्रीं—प्रपौत्रीं—नाम्नीं कन्यां,—गोत्रोत्पन्नाय —शर्मणः पुत्राय—पौत्राय—प्रपौत्राय—नाम्ने श्रीधररूपिणे वराय **प्रजो**त्पादनाय तुभ्यमहं संप्रददे—प्रतिगृह्यताम्’.

वरील सूत्रांत कविकल्पनेच्या अतिशयोक्तीचा लवमात्रहि भाग खात्रीनें आढळत नाहीं. आणि एखाद्यानें जर हें सूत्र नुसतें लक्षपूर्वक वाचलें, तर त्याच्या नजरेस हें आल्यांचून रहावयाचें नाहीं कीं, ह्या सूत्रांत जायापतीनें अवश्यमेव लक्षांत बाळगण्याजोगें असें केवढें अर्थगांभीर्य भरलें आहे. सकृद्दर्शनीं तर तें आपल्या **वसिष्ठात्रिभृगु** आदिकरून प्रख्यात कुलाची आठवण आपणास करून देतें, आणि नंतर त्या कुलांना अनुरूप असें मानिलेल्या आपल्या अगदीं अलीकडील वाड-

वडिलांचें स्मरण करून देतें; व त्याचा गर्भितार्थ असा कीं, ह्या व इतर सर्व बाबतींत आपण त्यांचें अनुकरण करावें. पुढें तें 'श्रीधररूपिणे' ह्या शब्दांच्याद्वारा वडिलांच्या कर्तव्यकर्माचा बोजा उचलण्याचें पुरुषवर्गाचे अंगचें सामर्थ्यहि निदर्शनास आणून देतें. ह्या शब्दाचा खरा अर्थ असा कीं, वराच्या अंगीं शारीरिक, मानसिक, नैतिक आणि पारमार्थिक सामर्थ्य पूर्णपणें विकसित झालें आहे. व असें जर नसेल, तर इतर सर्व खेरीजकरून साक्षात् **विष्णु** परमात्म्याचा नामनिर्देश करण्यांत मतलब कोणता? एवढें झाल्यावर तें सूत्र अगदीं स्पष्टपणें विवाहाचा खरा हेतु '**प्रजोत्पादनाय**' या शब्दांनीं प्रकट करून दाखवीत आहे. सारांश एवढ्या शास्त्रोक्त विधीनें स्त्रियेचें जें पाणिग्रहण करण्यांत येतें तें, आपली दुष्ट कामवासना तृप्त करण्याकरितां नसून, भृगु अथवा अत्रि कुलाला अनुरूप अशी प्रजा निर्माण करण्याकरितां होय. एवढें उदात्त तत्त्व त्या सूत्रांत भरलें आहे, हें आपणांपैकीं प्रत्येकानें विसरतां कामा नये. इतकेंच नव्हे, तर आपल्या तरुण पिढीच्याहि मनावरती त्याचा ठसा कायमचा उमटेल एतदर्थ प्रयत्न करणें आपलें कर्तव्यकर्म समजलें पाहिजे. भार्येला संस्कृत भाषेंत 'सहधर्मचारिणी' असा एक शब्द आहे व तो किती अन्वर्थक आहे हें सांगण्याची अवश्यकता आहे असें नाहीं. ज्याप्रमाणें पति हा आपल्या भार्येच्या मार्गक्रमणांत तिचा साहाय्यकारी असतो, तद्वत् तीहि त्याचें उत्क्रांतिमार्गांत पाऊल पुढें पडण्याला साहाय्यकारी ह्मणून मानणें अगदीं रास्त आहे. **लेकी** नामक आधुनिक प्रसिद्ध आंग्ल ग्रंथकाराचे लग्नासंबंधीं विचार संस्मरणीय आहेत. तो *असें ह्मणतो कीं :—' स्त्री ह्मणजे

---

* Woman is not a mere weaker man; and the happiest marriages are often those in which in tastes character and intellectual qualities, *the wife is rather the Complement of man, the reefletion of her husband.*' [ इटालिक्स आमचीं आहेत. ]

Map of life P. 308 Edn. 1901.

केवळ बलहीन पुरुष नव्हे; आणि जेथें रुचि, स्वभाव आणि बुद्धिमत्ता इत्यादि गुणांचे बाबतींत बायको ही नवऱ्याची पूरणिका किंबहुना प्रतिमा असते अशा स्त्रीपुरुषांचा संसार अत्यंत सुखावह असतो.'

वरील विचारांत आणि या विचारांत किती तरी साम्य आहे तसेंच डा॰ **स्टॉल**नामक दुसऱ्या एका ग्रंथकारानें आपल्या 'What a Young Man Ought to Know' नामक अति सुंदर पुस्तकांत जो उपदेश केला आहे, तो तर आमच्या तरुणांहि अगदीं नित्य हृदयाशीं बाळगण्याजोगा आहे. तो ह्मणतोः—

*'सारांश हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं लग्नानें स्त्रीपुरुषाच्या ज्या गांठी पडतात त्या एका दिवसापुरत्या अथवा वर्षापुरत्या अथवा आपल्या सुखाच्या दिवसांपुरत्याच केवळ नसून त्या जन्माच्या पडत असतात विपत्कालीं आणि संकटसमयीं कोणीतरी आपल्या जिव्हाळ्याचा आपल्या-जवळ असावा लागतो, एतदर्थ त्या गांठी पडत असतात, व पाडाव-याच्याहि असतात, व त्याहि अशाकरितां कीं परस्परांकडून परस्परांस स्फूर्तिसाहाय्य आणि सुख मिळावें ह्मणून.' त्या सर्वांचें सार कालिदास व भवभूति यांनीं आपल्या अमर वाणीनें ग्रथित केलें आहे.

गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ ।
रघुवंश.

प्रेयो मित्रं बंधुता वा समग्रा । सर्वे कामाः शेवधिर्जीवितं च ।
मालतीमाधव.

---

* Remember that marriage is not for a day or year; not simply for the period of prosperity but for life; for the time of adverity, when in the darkness you will need somebody to stand by you, *that each may be to the other an inspiration, a help and a stay*. [ इटालिक्स आमचीं आहेत. ] P. 212.

असो. वर निर्दिष्ट केलेलें आत्मदमन अंगीं आणण्याकरितां लागणारें अवश्य असें शारीरिक, मानसिक आणि नैतिक शिक्षण सुलभ रीतीनें आपणास आपल्या तरुणपिढीस कसें देतां येईल हें आपण पाहूं. उदाहरणार्थ एक काल्पनिक पूर्ण स्वरूपाचें विवाहित जोडपें आपण घेऊं, आणि त्यांच्या बाल्यावस्थेपासून ते मातापितृधर्मभार शिरीं उचलण्यास समर्थ होईपर्यंतच्या कालांतील त्यांचें शिक्षण कोणत्या प्रकारचें आहे हें पाहूं. ह्मणजे स्त्रीपुरुषसमागमाला उद्यत होण्याला अवश्य लागणारी जी पूर्व तयारी ती त्यांच्या अंगीं कितपत असते हें आपल्या लक्षांत येईल व त्याबरोबरच ह्या विशिष्ट समयीं मातेची कल्पना उदात्त करणाऱ्या परिस्थितीचें सामान्य स्वरूपहि आपणाला पहावयास सांपडेल. आपल्या या वरील काल्पनिक पूर्ण स्वरूपाच्या आणि अनुकरणीय अशा जोडप्यापैकीं मुलाचें वय १९ वर्षांचें आहे असें समजा. या वयांत पुरुषाची वैषयिक बुद्धि अथवा कामवासना जागृत होण्यास आरंभ होत असतो. या वयापर्यंत त्याचें पालनपोषण फार काळजीपूर्वक झालें आहे, आणि तो सुरेख असून त्याचे सर्वावयव अगदीं परिपक्व असा तरुणबांड आहे, त्याच्या अंगांत रसरसीत धमक अथवा जोम आहे, तो बुद्धिमान्, महत्वाकांक्षी, आणि मुख्यत्वेंकरून श्रद्धाळु आणि नीतियुक्त आचरण करणारा असा आहे असें आपण गृहीत धरून चालूं. अशा मुलाला जर कडकडीत शारीरिक व्रतें आचरण करावयास लाविलें, उघड्या हवेंत पुरेसा व्यायाम करावयास लावून जेणेंकरून त्याच्या मलमूत्राशयाची स्थिति चांगली राहील अशी तरतूद ठेविली, त्याला सर्व दिवसभर पुरेलसें मानसिक आणि शारीरिक काम सांगून विषयवृत्ती उचंबळून आणणाऱ्या कादंबऱ्या व दुर्व्यसनी आणि टवाळ मंडळीची संगत यांच्यापासून तो अलिप्त राहील अशी विशेष काळजी वाहिली; व एकसमयावच्छेदेंकरूनच चांगल्या पुस्तकांची काळजीपूर्वक निवड करून तीं त्यास वाचावयास देऊन तद्द्वारा त्याचें नैतिक आणि पारमार्थिक आचरण सुधारलें; सारांश या वर लिहिलेल्या सर्व गोष्टी जर एखाद्यानें

बुद्धिपुरस्सर चांगल्या रीतीनें केल्या तर—एखाद्या मुलाचें पूर्व-संचितच जर फार खरतड असेल तर गोष्ट निराळी—तो पितृधर्मभार शिरीं उचलण्यास अगदीं योग्य असा तरुण पुरुष खरोखर तयार होईल यांत संदेह नाहीं. असें जर तरुण मुलांचें संगोपन झालें तर त्यांचे ठिकाणीं विषयवृत्ति अकालींच उच्छृंखल झाल्या आहेत असें क्वचित्च दृष्टीस पडेल. अशा रीतीनें जोपासना झालेल्या मुलाचें सर्वांग सुंदर, रेखींव आणि बांधेसूद असें होतें. आतां आपण अशी कल्पना करूं कीं अशाप्रकारें वाढीस लागलेल्या मुलाचे ठिकाणीं यौवनश्री प्रफुल्लित झाली आहे. बुद्धि आणि मन यांचे कसोटीस उतरणारे जे सद्गुण आहेत त्यांचा बराच भाग त्याच्या वांट्याला आलेला आहे व ज्यांत आपल्याला आपल्या देशबांधवांच्या अत्यंत उपयोगीं पडतां येईल असा एखादा अंगमेहनतीचा कृत्यभार उचलण्याची जबरदस्त महत्वाकांक्षा त्याचे ठिकाणीं उदय पावली आहे. असा मनुष्य ह्मणजे मानववर्गाचा अत्युदात्त नमुना होय. पण अशा नररत्नालाहि सर्वतो-परि पूर्ण होण्यास, स्वभावाचा कठोरपणा जाऊन अंगीं नम्रता येण्यास, स्वसंपादित ज्ञानाचा लोकांना फायदा करून देण्यास नाजुक कारागि-राच्या हस्तकौशल्याची अवश्यकता आहे. हा नाजुक कारागीर ती स्त्री होय. पतीच्या स्वाभाविक सद्गुणांत जर कांहीं वाकडेपणाचा कलंक असला तर तो घालविण्यास भार्येची संगतिच कारणीभूत होते. तसेंच भार्येच्या नाजुक आणि विकारवश स्वभावाला विचारीपणाचें स्वरूप देण्यास पुरुषाचीच संगति कारणीभूत होते. एवंच परस्परांनीं आप-आपल्या स्वभावांतील उत्तमांश देऊन परस्परांच्या उन्नत्यर्थ झटावयाचें असतें. सारांश **प्रेम** आणि **स्वार्थत्याग**विषयक श्रेष्ठ सद्गुण परस्पर परस्परापासून न कळत शिकत असतात.

आतां आपण आपल्या या वरील काल्पनिक पूर्ण स्वरूपाच्या आणि अनुकरणीय विवाहित जोडप्यांपैकीं मुलीच्या शिक्षणासंबंधीं विचार करूं. अशी कल्पना करा कीं मुलगी ऋतुस्नात होण्याच्या [illegible]ंत आहे

ह्मणजे १२ वें वर्ष तिला लागलें आहे असें कां ह्मणाना. असेंही आपण गृहीत धरूं कीं मुलीच्या आतांपर्यंतच्या वयाच्या आणि सामर्थ्याच्या मानानें तिला मानसिक आणि नैतिक शिक्षण मिळालें आहे. संसारांत ज्या हजार गोष्टींमुळें स्त्रियांची अवश्यकता पावलोगणिक लागते अशा सर्व गृहकृत्यांचें चांगलें ज्ञान झालें आहे. तिच्या पालकांनीं तिची काळजीपूर्वक खबरदारी घेतल्यामुळें ती चंचल आणि दुर्व्यसनी स्त्रियांच्या संगतीपासून आणि मन अस्थिर करणाऱ्या शृंगाररसप्रधान कादंबऱ्यांपासून अगदीं अलिप्त राहिली आहे. हलक्या, साध्या, पौष्टिक आणि अनुद्दीपक अशा आहारावर ती वाढली आहे. योग्य शारीरिक व्यायामानें तिच्या इंद्रियांचा व्यापार सुरळित चालू आहे. मुलीची इतक्या दिशेनें काळजी घेतल्यानंतर वरील शिक्षणक्रम जर असाच कायम ठेवला आणि **प्रेम, कर्तव्यकर्म, व परोपकार** यांच्यासंबंधीं उदात्त कल्पना तिच्या डोक्यांत जर चांगल्या भरवून दिल्या तर सर्वगुणमंडित आणि स्त्रीवर्गाला भूषण अशी स्त्री तयार केल्यासारखें होईल. अशा सुशिक्षित मुलीस पितृगृहींच जरी ऋतु प्राप्त झाला तरी तिला पतिसुखप्राप्तीची घाई होणार नाहीं.

हें पक्कें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, स्वभाव आणि शारीरशास्त्र यांच्या नियमाविरुद्ध मनुष्याचा वर्तनक्रम असल्यामुळेंच त्याच्या ठिकाणीं विषयवासना एवढी उच्छृंखल होते आणि विषयतृप्ति व खरें प्रेम यांतील भेदच कळेनासा होतो. अन्नावर यत्किंचित्‌हि वासना नसतां आपण आपल्या आणि आपल्या मुलांबाळांच्या पोटांत भरीवर भर किती वेळां करीत असतों. अमुक एका पदार्थाचें सेवन खात्रीनें अपायकारक आहे, हें माहित असूनहि तो पदार्थ खाऊन आपलें रसनेंद्रिय आपण कितीदा तरी संतृप्त करून घेतों? अशा अंधपणानें इंद्रियलोलुप होऊन, आपण आपली शरीरयात्रा कायमची कष्टमय करून घेतों यांत नवल तें कोणतें? उघड्या मैदानांत, मोकळ्या हवेंत व्यायाम करण्यानें हा दुःखद परिणाम अंशतः [illegible]ळतां येण्याजोगा आहे हें खरें, अथापि तरुणमंडळीपैकीं,

बहुतेकजण व्यायामाचे बाबतींत किती नियमित असतात हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. बरें ही दुर्दशा एवढ्यानेंच संपली असेंहि नाहीं. जणूं काय हें औदासिन्य आणि क्षार, मिरीं, मसाले इत्यादिकांनीं अतिशय चमचमित केलेले पदार्थ आणि उद्दीपक मिष्टान्न यांचें सेवन हीं जननेंद्रियांचें मज्जातंतू संतप्त करून विषयवासना वाढविण्यास अपुरतीं होत ह्मणून त्या सर्वांस शृंगारप्रवणता उद्बोधित करणारीं नाटकें आणि कादंबऱ्या आणि कामविचारपरिपूर्ण पुस्तकें यांच्या वाचनाची पुरवणी लावण्यांत येते. व हीं पुस्तकें तरुण मुलांच्या हातांत ज्यावेळीं त्यांचीं डोकीं एखाद्या शास्त्रीय प्रश्नांत गढावयास पाहिजेत अथवा एखाद्या खऱ्या लोककल्याणाच्या कार्यांत व्यग्र व्हावयास पाहिजेत अशाच ऐन प्रसंगीं पडत असतात. एवढी मनाला क्षुब्ध करणारी सामग्री तरुण मनुष्याचा सर्वस्वी नाश करण्यास अपुरी असेल ह्मणूनच कीं काय त्याचे स्नेही व ओळखीचे लोक, आपल्या प्रेमगत गुप्त कारस्थानाची आणि एखाद्या रूपसंपन्न नवयौवना गुणवतीच्या अब्रूचें मातेरें करण्यांत व तिच्या धवल यशःपटलास कलंक लावण्यांत अथवा एखाद्या विषयासक्त आणि निर्लज्ज वारांगनेचे दलाल बनण्यांत जें परमावधीचें सुख त्यांना मिळतें त्या सुखाची बढाई मारण्यास त्याच्याजवळ तयारच असतात. अशा प्रकारें लोकांची नीतिमत्ता भ्रष्ट करणारे कुनीतिरूपमहाव्याधिग्रस्त आपण ज्याला साधारणतः चांगला समाज ह्मणतों अशा समाजांत थोडथोडके असतात असें नाहीं. आणि अशांच्या भ्रष्टाकारास बळी पडणाऱ्यांची संख्यादेखील कमी असते असें नाहीं. आह्मा हिंदूंच्या स्त्रिया तर कशाहि हितचिंतक असल्या तरी त्या परेच्छानुवर्ती व अज्ञानांत निमग्न असतात व त्या घरांतील विवाहित तरुणांची—अथवा बालांची—अकालीं जागृत झालेली विषयवासना तृप्त करण्यास नाखुषच असतात असें नाहीं. तर अल्पवयी नववधूस व तिच्या बालपतीस एके खोलींत ढकलून देऊन दार लाऊन घेण्यास त्या रतिभरदेखील मागेंपुढें पहात नाहींत. पण हें सर्व कशाकरितां? तर विपत्ति, व्याधी, आणि वामनमूर्तींचा वंश तयार करण्याकरितां. पण तेंच जर

तरुण मनुष्याच्या मनावर धार्मिक बुद्धीचा पगडा बलवंत असला तर ह्या वरील प्रतिकूल परिस्थितीच्या कचाटींत सांपडूनहि ती विवाहित जोडप्याची नौका रतिभरदेखील मार्गच्युत व्हावयाची नाहीं. पण खेदाची गोष्ट ही कीं आजच्या काळांत जेथें धर्मबंधनें शिथिल करण्यास चोहों बाजूनीं हरप्रयत्न घडत आहे तेथें धार्मिक बुद्धीचा जबरदस्त परिणाम ज्याच्या मनावर झाला आहे असा एक तरी मनुष्य सांपडेल काय?

असो. आतां आपण आपल्या काल्पित जोडप्याकडे वळूं. त्यांचा विवाह झाला आहे असें समजूं. आणि त्यांच्या अंगीं असलेल्या पितृत्वास अवश्यक अशा शारीरिक, मानसिक, आणि नैतिक गुणांचा विचार करूं. आपण असें गृहीत धरून चालूं कीं तरुण मनुष्याची पंचविशी उलटली आहे व तरुण स्त्रीच्या ठिकाणीं यौवनश्री अगदीं प्रफुल्लित झाली आहे ह्मणजे तिलाहि २० वें वर्ष लागलें आहे. वर वर्णन केलेल्या शिक्षणक्रमाचा लाभ उभयतांना मिळाल्यामुळें उभयतांची शरीरकाठी बांधेसूद आणि रेखीव आहे; उभयतांच्या इंद्रियांचे व्यापार अगदीं सुरळित चालू आहेत; उभयतांना रोगाची कशीती ओळखसुद्धां नाहीं; दुर्व्यसनांत अथवा कुमार्गानें विषयसुखाचा अनुभव घेण्यांत त्यांनीं आपल्या वीर्यशक्तीचा लवलेशदेखील खर्ची घातला नाहीं; नियमानुसार वर्तनक्रम आणि नेमस्तपणाच्या संवयीमुळें त्यांच्या ठिकाणीं विषयवासना यत्किंचित्हि उच्छृंखल झालेली नाहीं. मानसिक आणि नैतिकदृष्ट्या बोलावयाचें झाल्यास आपलें हें जोडपें अगदीं सुशिक्षणसंपन्न असें आहे व खरा जीवनक्रम अथवा ' जीवितकर्तव्य ' ह्मणजे सणावाराची चैन नसून अति महत्वाचा व्यवसाय होय, हें पूर्णपणें त्यांना कळून चुकलें आहे. समान गुणधर्माचीं दोन माणसें विवाहाच्या पवित्र रज्जूनें एकत्र निगडित झालीं आहेत असें समजून उभयतांच्या मनांत परस्परांविषयीं आदरबुद्धि वसत आहे. प्रत्येक एकमेकाच्या उत्क्रांतिमार्गक्रमणांत एकमेकास साहाय्य करीत आहे. उभयतांच्या परस्परा-

वरील निष्काम प्रेमानें उभयतांचा संसार सुकर आणि सुसंगत असा झाला आहे.

ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।
सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ *

विषयलोलुप जनांची कानउघाडणी करण्याच्या उद्देशानें भगवंतानीं केलेल्या ह्या अत्युदात्त उपदेशाचा भावार्थ उभयतांच्या मनांत पूर्णपणें बिंबल्यामुळें अत्यंत शुद्ध, उदात्त व प्रेमळ आणि उपयुक्त विचारांखेरीज इतर विचारांना उभयतांच्या अंतःकरणांत थारा मिळत नाहीं. उभयतांना ही गोष्ट कळलेली आहे कीं मानवी प्राणी ह्मणजे आत्मा हा वेळ-पावेतों आपल्या विचारानें जीं कांहीं चित्रें निर्माण करीत आला त्या चित्रांच्या अंगच्या सर्व शक्ती एकवटून बनलेलें एक स्थूल रूप होय. हें ह्मणणें पुष्कळ वाचकांना दुर्गम व निरर्थक असें दिसेल, पण त्याला कांहीं इलाज नाहीं. अलीकडे अशी एक उपपत्ति निघाली आहे कीं, मनुष्याच्या मनांत ज्या ज्या वेळीं विचारतरंग उदय पावतात, त्या त्या वेळीं त्या विचारानुरूप चित्रें आकाशांत निर्माण होत असतात. ह्या विचारनिर्मित चित्रांचा परिणाम विचारांच्या सदसद्भावावरच अव-लंबून असतो. विचार जर चांगले असतील, तर कार्येंहि अर्थात् त्यांतून चांगलींच निपजतील. विचार जर वाईट असतील, तर त्यांचीं कार्येंहि वाईटच निपजणार. सारांश एका मनुष्याच्या सुविचाराचें कार्य

---

* विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषाच्या मनांत त्या विषयावर प्रीति बसते, प्रीति बसली ह्मणजे तो विषय हवा अशी इच्छा उत्पन्न होते, इच्छा सफल झाली नाहीं ह्मणजे संताप चढतो, संतापानें अविचार, अविचारानें स्मरणशक्तीचा गोंधळ, स्मृतिनाशानें बुद्धिनाश व बुद्धिनाशानें अखेरीस जीवाची सर्वस्वी हानी अशी ही परंपरा आहे.

दुसऱ्या एका चांगल्या विचारशक्तीच्या माणसाकरवीं घडत असतें व कुविचारांचें कार्य ज्याला विचारशक्ति ह्मणून मुळींच नाहीं, अशा निर्बल मनुष्याकडून घडत असतें. आचरण करणारा मनुष्य नुसता निमित्ताचा धनी असतो. कोणत्याहि सदसत्कार्याबद्दल जर कोणी खरोखर जबाबदार असेल, तर ज्याच्या ठिकाणीं ते सदसद्विचार उत्पन्न होतात तोच पुरुष होय. एखाद्या मुलानें जर एखाद्याचा खून केला, तर खरा अपराधी तो खून करणारा नसून, त्याच्या ठिकाणीं ज्या मातापितरांकडून दुर्गुण संक्रमित झाले, तेच खरोखर अपराधी होत. कारण संततीचेठायीं गर्भावस्थेंतच मातापितरांकडून शरीराबरोबरच आत्म्याचे अंशासहि आकृति, विकृति आणि प्रकृति या त्रयीचे गुण संक्रमित होत असतात, ही गोष्ट आज कोण नाकबूल करील? आमचे प्राचीन साधुसंत विरक्त होऊन वैराग्यस्थितींत आयुष्य कंठित असल्यामुळें त्यांचा जगाला उपयोग फार थोडा होत होता असा एक आक्षेप अलीकडे घेण्यांत येतो. पण त्यांच्या विरक्ततेचा जर या वरील उपपत्तीच्या दृष्टीनें विचार केला तर ते विरक्त राहून आपल्या सुविचारांचें कार्य चांगल्या आत्म्याकरवीं घडवून आणीत होते असेंच ह्मणावें लागतें. व त्यांच्या त्या विरक्ततेचा हा काय लहानसान फायदा आहे काय? पारमार्थिक भाषा वापरावयाची झाल्यास यालाच अलिप्त राहून कर्म करणें अथवा मानसिक कार्य असें ह्मणतात. सारांश मद्यमांसादिकांस प्रत्यक्ष स्पर्श केला नाहीं अगर प्रत्यक्ष व्यभिचार केला नाहीं आणि मद्यमांसाचें अगर सुंदर परस्त्रियांचें नुसतें चिंतनच केलें तरीहि अभक्ष्यभक्षणाचा आणि व्यभिचाराचा सर्वस्वी दोष चिंतकाचे माथीं पडतो ही गोष्ट विसरतां कामा नये. तेव्हां आमच्या समाजधुरीणावर आणि आमच्यांतील चांगल्या सुशिक्षित लोकांवर नुसत्या विचाराबद्दल केवढी जबाबदारी आहे हें जाणून, ज्या मनोभूमिकेंत सद्विचारतरुवरांचा अपूर्व बाग वाढीस लागलेला असतो तेथें कुविचारांचा केरकचरा यत्किंचितहि पडणार नाहीं अशाबद्दल जर त्यांनीं खबरदारी घेतली तर त्या बागेंत किती मनोहर फळें दृष्टीस पडतील

हें सांगण्याची अवश्यकता आहे असें कांहीं नाहीं. असो; या विषयांतराबद्दल वाचकवर्ग माफी करतील. अशा प्रकारें बनलेलीं विचार-निर्मित चित्रांचीं स्थूलरूपें आपण आहोंत हें जाणून आपल्या शरीराला व आत्म्याला काल्पनिक पूर्णस्वरूप प्राप्त होण्यासाठीं आपल्या वर्तन-क्रमाला ते उभयतां योग्य वळण लावीत आले आहेत. सृष्टिनियमांची बुद्धिपूर्वक केलेली पारख आणि तदनुसार वर्तनक्रम यांच्यायोगें ऐक्यभाव आणि सद्गुण वाढीस लागतात; आणि सृष्टिनियमांचें उल्लंघन करण्यानें बेबनाव आणि दुर्गुण उत्पन्न होतात, ही गोष्ट त्या उभयतांच्या ध्यानांत पूर्णपणें येऊन चुकली आहे. सृष्टिनियमानुसार वर्तनक्रमाकडे त्यांची स्वभावतःच प्रवृत्ति होत आहे. **लोकसेवा** हीच आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यता आणि **प्रेम** हीच सर्व कर्माची गुरुकिल्ली होय हें ते जाणून आहेत. (येथें प्रेम या शब्दाचा अर्थ कृत्यांची साधनसामग्री आणि उद्देश हीं एकमय होऊं देणें ह्मणजे कृत्याकरितांच कृत्य करणें 'कार्य-मित्येव कार्यम्' असा घ्यावयाचा) आणि या उदात्त तत्त्वानुरूप आपल्या दैनिक वर्तनक्रमाला वळण लावण्याचा होतां होईल तों ते प्रयत्न करीत आहेत. अशा रीतीनें जी एक प्रकारची जबाबदारी त्यांच्यावर आलेली असते, ती पूर्णपणें जाणून प्रजोत्पादनाचें कर्तव्यकर्म ह्मणजे लोकसेवेचाच एक भाग आहे असें ते मानितात. अति श्रेष्ठ आणि अत्युन्नत अशा आत्म्याची सांगड अति पवित्र आणि शुद्ध अशा देहाशींच होत असते. आणि असल्याच महात्म्याकडून अत्यंत लोकहित होत असतें व तेच अशा रीतीनें लोकसुखसंवर्धनार्थ कारणीभूत होत असतात हें उभयतां जाणून आहेत. ह्मणून अत्युन्नत अशा आत्म्यास राहण्यास योग्य असे पवित्र आणि शुद्ध मानवी देह निर्माण करून, असें दंपत्य आपल्या समाजाची प्रत्यक्ष आणि खरी सेवा करीत असतें. ज्यांच्या अवयवांची वाढ पूर्ण झाली आहे अशा दंपत्याला गर्भधारणेचें कार्य सिद्धीस नेण्यास एकच स्नेहसंश्रय पुरेसा आहे. व याव्यतिरिक्त अन्य कोणत्याहि वेळीं प्रेमसमागमसुखाचा अनुभव घेणें ह्मणजे मुख्य जीवन जें **वीर्य** त्याचा निवळ अपव्यय करणें होय हें उभयतांनाहि माहीत असतें. तेव्हां

अशा निरोगी आणि शरीरसौष्ठवयुक्त दंपत्याचा प्रेमसमागम ह्मणजे ज्यांत आपल्यापैकीं बहुतेक लोक वारंवार अविचारानें आणि विषयांधपणानें निमग्न असतात आणि ज्यापासून परिणामीं दुःख आणि व्याधी भोगाव्या लागतात असें शारीरिक कर्म होय असें कधींच ह्मणतां यावयाचें नाहीं. आपल्या या अनुकरणीय दंपत्याला ज्यांत आपली बरीचशी शक्ति खर्चीं घालावी लागेल अशीं इतर अनेक महत्कृत्यें करावयाचीं असल्याकारणानें आपल्या शक्तीचा-वीर्याचा-विषयसेवनांत अपव्यय करण्याचें त्याच्या मोठें जीवावर येतें. शक्तींच्या एकीकरणाचें तत्व ब्रह्मांडाला आणि त्यांतील मानवी वर्गाला सारखेंच लागू आहे. आपल्या पोटीं असें एखादें पुत्रसंतान व्हावें कीं जें पुढें जगतांत लोकसेवेला आपल्यास वाहून घेईल अशी दृढतर आशा जेव्हां वरील अनुकरणीय दंपत्याच्या ठिकाणीं उदय पावते तेव्हां ते पुढीलप्रमाणें योजना करून ठेवित असतात. प्रथमतः या मनोवांछित प्रेमसमागमासाठीं एक रमणीय आणि हवाशीर असें ठिकाण ते पसंत करून ठेवितात. मातापितरांचें कल्पनासामर्थ्य, आपल्या भावी संततीच्या ठायीं बुद्धिमत्ता, नीतिमत्ता, धार्मिकपणा, आणि शरीरसौंदर्य या बाबतींत विशिष्टप्रकारचें वळण लागण्यास कसें कारणीभूत होतें ही गोष्ट जाणून त्या ठिकाणीं अशाच वस्तूंचा संग्रह केलेला असतो कीं जेणेंकरून वाईट ह्मणून कांहींच नजरेस पडणार नाहीं; पण उलटे ज्यांच्याकडे नजर गेली असतां उदात्त आणि श्रेष्ठतर मनोवृत्ति जागृत होतील. उदाहरणार्थ साधुसंतांच्या, नामांकित देखण्या पुरुषांच्या, देशहितार्थ अश्रांत श्रम करणाऱ्या मानवरत्नांच्या, उदार राजपुरुषांच्या रम्य तसबिरांच्या देखाव्यानीं त्यांचें शयनगृह सुशोभित केलेलें असतें. आपल्या भोंवतीं स्वभावसिद्ध सुंदर वस्तूंचा संग्रह केलेला असतो. अशी सामग्री मिळविल्यानंतर ज्यावेळीं आपली शरीरप्रकृति अगदीं निरोगी असून कोणत्याहि प्रकारची शारीरिक अथवा मानसिक व्यथा नसेल, जेव्हां मनाला कोणत्याहि प्रकारचा व्याप नसून तें अगदीं शांत असेल, जेव्हां उभयतांच्या व्यवहारांत शुद्ध प्रेमाचें स्वरूप अगदीं मूर्तिमंत दृष्टीस

पडेल अशा संधीची ते वाट पहात असतात, आणि नंतर अशा प्रकारची योग्य वेळ कोणती हें आपल्या सहज ज्ञानानें जाणून ते परस्पर प्रेरित होत्साते ह्या वरील महत्वाच्या स्नेहसमागमाचें सुख अनुभवितात. अशाप्रकारच्या स्नेहसमागमाला उभयतांच्या सदसद्विवेकबुद्धीची पूर्ण अनुमति असते ही गोष्ट विसरतां कामा नये. हा स्नेहसमागम ह्मणजे दोन शरीरें परस्पर संलग्न होण्याची केवळ शारीरिक क्रिया नसून ज्यांत एकाच्या अंगचें अखिल मानसिक, नैतिक आणि शारीरिक तत्व दुसऱ्याच्या मानसिक, नैतिक, आणि शारीरिक तत्वाशीं अगदीं एकरूप होतें अशी क्रिया होय. **भवभूतीनें** आपल्या **उत्तररामचरित्रांत** ' अपत्य ' या शब्दाची व्याख्या देतांना ह्या स्नेहसमागमाच्या अथवा एकरूपतेच्या स्वरूपाचें मोठें हृदयंगम वर्णन केलें आहे तें असें:—

अंतःकरणतत्वस्य दंपत्योः स्नेहसंश्रयात् ।
आनंदग्रंथिरेकोऽयमपत्यमिति बध्यते ॥

भावार्थः—मातापितरांच्या अंतःकरणांच्या तत्वांची आणि स्नेहसंश्रयाच्यायोगानें बांधलेली अशी जी आनंदमय गांठ तिला ' अपत्य ' ह्मणावें.

अंतःकरणाच्या ऐक्यानें व उन्नतीच्या प्रबल इच्छेनें एकरूप झालेल्या दंपत्याच्या ऐक्याचें व वासनेचें शरीरसमागम हें केवळ बाह्य स्वरूप आहे. अशा प्रकारच्या अंतःकरणतत्वैक्यापासून उत्पन्न झालेल्या अपत्याला पुढील कव्युक्ति अगदीं अक्षरशः लागू पडते.

' सन्ततिः शुद्धवंश्याहि परत्रेहच शर्मणे '

शुद्धवंशांत जन्मास आलेलें अपत्य हें मातापितरांना इहपरलोकीं सुखाचें साधन असतें. बुद्धीच्या क्षुद्रतेचा व मनाच्या मलिनतेचा अथवा स्वार्थैक दृष्टीचा विटाळ मातापितरांनाच जर झालेला नसला, तर त्यांच्या संततीच्या ठिकाणीं ते दुर्गुण अंशतःदेखील दृष्टोत्पत्तीस यावयाचे नाहींत, यांत नवल तें कोणतें? अशा प्रकारच्या समागमाप[illegible]न प्राप्त

होणाऱ्या सुखाचा आणि थोरपणाचा अनुभव एखाद्या विषयांध क्षुल्लक पुरुषास कल्पनेनेंसुद्धां कळणें अशक्य.

असो. आतां आपण आपल्या हल्लींच्या मंडळींच्या अंगच्या शारीरिक, मानसिक आणि नैतिक सामर्थ्यांची वरील काल्पनिक पूर्णस्वरूपाच्या विवाहित जोडप्याच्या अंगच्या वर निर्दिष्ट केलेल्या गुणाशीं तुलना करून पाहूं.

आज संसारांत ज्या हजारों स्त्रिया गढून गेल्या आहेत त्यांच्यापैकीं जिच्या ठिकाणीं पूर्ण आरोग्याची छाया आहे अशी एकहि स्त्री सांपडेल किंवा नाहीं याची वानवाच आहे. उच्च वर्गांतील लोकांत जर कोणी आरोग्यसंपन्न स्त्रिया आढळल्या तर त्यांचीहि संख्या हाताच्या बोटापेक्षां जास्त जाणार नाहीं. असें असूनहि सर्व स्त्रिया संतानोत्पादनाच्या नादीं पूर्णपणें लागलेल्या दृष्टीस पडतील. आणि आपल्या मुलांपैकीं वहुतेकांच्या गर्भधारणेची क्रिया स्त्रियांच्या रोगावस्थेंतच होते हें जर आपण धडधडीत कबूल करतों तर पूर्वीपेक्षां हल्लीं रोगाचें मान शतशः वाढलेलें आहे याबद्दल आपणाला आश्चर्य तें कां वाटावें? हल्लीं मुली आपल्या वयाच्या १२।१३ व्या वर्षींच पतिसुखानुभव घेण्यास उद्युक्त होतात. कांहीं ठिकाणीं तर या वयापूर्वींच निंद्य प्रकार दृष्टीस पडतो त्यावद्दल येथें अवाक्षरदेखील काढावयास नको. अस्थिभाग आणि स्नायू हीं जोमानें वाढीस लागण्याचा काल खरोखर ह्मटला असतां हाच होय. मातृत्वाच्या भारानें अस्थि आणि स्नायू या उभयतांची वाढ कुंठित होते आणि ह्मणूनच ज्यांचें आयुष्य सामान्यतः आळशीपणांत व पोशिंदीपणांत जात असतें व ज्यांना कधीं घराचा बाहेरचा दरवाजा ओलांडण्याचा अथवा इकडची काडी तिकडे उचलून ठेवण्याचें ठाऊक नसतें अशा श्रीमंत, सुखवस्तु लोकांत स्नायूंचा बळकटपणा एकाच्याहि ठिकाणीं दृष्टीस पडत नसून उलटा नाजुकपणाच दृष्टीस पडतो. अशा नाजुक, अस्थिर व लहरी प्रकृतींत कायिक आणि वाचिक यत्किंचित् जरी चूक घडली तरीदेखील विकृति होण्याचा

संभव असतो आणि ह्मणूनच स्त्रियांना वातोन्माद, मानसिक संक्षोभ, इत्यादि विकार जडलेले दृष्टीस पडतात. त्यांची प्रजोत्पादनाची पद्धत पाहिली तर विनाशाचा भयप्रद देखावाच दृष्टीस पडतो. बहुतेक स्त्रियांच्या स्तनपेशा ह्मणजे अगदीं झिजून गेलेलीं इंद्रियें असतात. अशा पोचट स्तनपेशींतून कोणत्या मुलाला पोटभर दूध मिळून त्याचें पोषण व्हावें? मग अशा स्थितींत दूध पाजणाऱ्या दायांची अवश्यकता लागावी यांत नवल तें कोणतें?

अंडाशय आणि गर्भाशय हीं उभयतां बहुधा नाजुक झालेलीं असतात. कटि आणि वातशूलादि रोगांनीं तर आपलें बिऱ्हाड कायमचें केलेलें असतें. आणि पुरुषसंग ह्मणजे पुष्कळदा त्यांना अगदीं जिवावरचा वाटतो. पण या सर्व गोष्टी बाजूला ठेवून, आपल्याला मातृत्व यावें या हेतूनें बहुतेक स्त्रियांच्या हातून अविचारानें अहर्निश प्रयत्न घडत असतात. व त्याचा परिणाम असा होत आहे कीं, पसतिशी अथवा चाळिशी उलटण्याच्या पूर्वींच चेहऱ्यावर फिक्केपणा येऊन, जरेची पूर्ण छाया दिसूं लागते, कंबर वाकडी होऊन गति स्खलित होते, शारीरिक श्रम करण्यास यत्किंचित्हि सामर्थ्य उरत नाहीं. सर्वांशीं सेवकगणांच्या आधीन रहावें लागतें. पण हे सर्व खेळ पसतीस चाळिसांच्या आंत क्षयरोगानें जर त्यांना अकालींच यमसदनीं पाठविलें नसेल, तर दृष्टीस पडावयाचे. मातृत्वाच्या अति नियमित भारानें ज्या सुखी आणि निरोगी राहिल्या असत्या, पण बहुतेक प्रतिवर्षाला मुलाला जन्म द्यावा लागल्या कारणानें ज्या आतां केवळ वाळून खोडुक बनलेल्या आहेत, अशा नाजुक प्रकृतीच्या तरुण स्त्रियांचीं अनेक उदाहरणें माझ्या प्रत्यक्ष पाहण्यांत आलीं आहेत.

सारांश आपल्या तरुण पिढीनें कांहीं पूर्व तयारीवांचून गृहस्थाश्रमांत प्रवेश करणें ही गोष्ट केवढी खेदकारक आहे, हें वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. क्षणिक सुख देणारें असें नामरहित शारीरिक कर्म आपणास करावयाचें असतें आणि त्या क्षणिक सुखाचा पाठलाग

करण्यास आपणाला पूर्ण मुभा आहे, कोणाची ना नाहीं. या दोन गोष्टींपलीकडे आपण काय करीत आहों याचें ज्ञान तरुण पिढीला क्वचित्च असतें. लहान मुलाच्या पुढें जर मिठाईनें भरलेलें ताट आणून ठेविलें, तर तें जसें वीट येई तोंपर्यंत खात असतें ( प्रायः खात नाहींच. ) तद्वत्च हीं तरुण मुलें अंगांत धमक आहे तोंपर्यंत विषयसुखांत वारंवार मग्न होत असतात. हा त्यांचा क्रम कित्येक महिनेपर्यंत अथवा वर्षोगणितदेखील चालू असतो. ते कोणच्याहि सदुपदेशाला धूप घालावयाचे नाहींत. उलटें कामोद्दीपक पौष्टिक पदार्थ आणि औषधें यांचें सेवन करून आपली स्वाभाविक भोगतृष्णा अधिक वृद्धिंगत करून घेत असतात. अशा धुंदीनें ते विषयसुखाचा पाठलाग करीत असतात. आणि ही डोळ्यावरील धुंदी केव्हां उडते ह्मणाल तर एखाद्याचें वीर्यसामर्थ्य जेव्हां अगदीं नष्ट होण्याच्या बेतांत येतें तेव्हां. पण हाय! हाय! ही जागृति अति उशिरानें! तिचा कांहींएक उपयोग नाहीं. अखेरीस मनुष्याच्या अंगावर कांटा उभा राहणारी गोष्ट ह्मणजे प्रजोत्पादनसामर्थ्य अगदीं नष्ट होण्याचीं प्रत्यक्ष चिन्हें मूर्तिमंत दिसूं लागतात. शरीरप्रकृति अगदीं ढासळून गेली आहे याची साक्ष त्या मनुष्याचा चेहरा देऊं लागतो. त्यानें आपल्या वीर्याचा फाजील अपव्यय केल्यानें त्याच्या गतीची स्थिरता अथवा चालण्याची साहजिक ऐटदेखील नष्ट होते. मानसिक अथवा शारीरिक श्रम कांहीं कालपर्यंत निश्चयानें करण्यास तो अगदीं असमर्थ होतो. क्रमशः डोक्याचें आणि छातीचें दुखणें हे त्याचे नेहमीं येणारे पाहुणे बनतात. अशांना सर्दीचा विकार तेव्हांच जडतो आणि श्वासनलिकेचा दाह हा तर अगदीं सामान्य होऊन बसतो. त्याच्या प्रकृतीला ज्या संवयी लागलेल्या असतात त्यांचा नियमितपणा एकामागून एक नाहींसा होतो आणि त्यांच्याजागीं सदासर्वकाळ ग्लानी आणि औदासिन्य हीं येतात. मनाचा सरळपणा आणि उत्साह, साहस-कर्म करण्याला लागणारा जोम, संसारांतील अडचणीच्या प्रसंगांना धैर्यानें तोंड देण्याच्या सामर्थ्याचें ज्ञान इत्यादि मर्दानीचे सर्व गुण त्याला सोडून जातात. हें सारांशरूपानें सांगावयाचें झाल्यास त्यानें आपल्या

वीर्याचा फाजील व्यय केल्यामुळें त्याच्यावर अकालींच वृद्धापकालाची छाया पडलेली असते. त्याच्या अनियंत्रितपणामुळें फार थोड्या कालांत त्याच्याभोंवतीं अशक्त, रोगट अथवा कुरूप अशा मुलांबाळांनीं भरलेल्या मोठ्या कुटुंबाचा बाजार गोळा होतो; आणि त्याला त्यांच्या नानाविध आणि अस्वाभाविक गरजा पुरविण्यास मानसिक उत्साह आणि शारीरिक सामर्थ्य हीं दोन्हीं नसल्यामुळें त्याचा जीव अगदीं मेटाकुटीस येतो. अनिवारपणें कामाचरण करण्याची ज्याला संवय झाली नाहीं अशा मनुष्याला नेमस्तपणाच्या आणि मिताहारीपणाच्या संवयी लावून घेण्याचें काम जितकें सुकर असतें तितकेंच तें काम अनिवार भोगतृष्णातुर मनुष्याला दुष्कर असतें. एवंच कांहीं अंशीं आपल्या वृद्धिंगत पावणाऱ्या कुटुंबाच्या गरजा भागविण्याच्या चिंतेनें, स्वतःच्या शरीराला स्त्रीसमागमानें लागलेल्या सारख्या झुरणीनें, आणि कांहीं अंशीं तज्जन्य रोगानें तो एकसारखा खचत असतो. व या स्थितींत एकादे दिवशीं त्याजवर ईशकृपेकरून त्याच्या आयुष्याच्या नाटकाचा शेवटचा पडदा पडतो. व्यावहारिकदृष्ट्या तर त्याचें जीवित अगदीं निरर्थक झालेलें असतें. आणि हीच स्थिति आज बहुतेक होतकरू तरुण मनुष्यांची होणार कीं काय याबद्दल खेद वाटतो.

अंगीं पितृत्व येण्याच्या नादीं लागलेल्या बहुतेक लोकांच्या शारीरिक स्थितीचें वर्णन येथवर झालें हें बस्स होईल असें वाटतें. आतां आपण त्यांच्या मानसिक आणि नैतिक सामर्थ्याकडे जरा नजर फेकूं, म्हणजे साधारणतः ज्या प्रकारची प्रजा निर्माण व्हावी असें आपणाला वाटतें त्याची खरी अटकळ आपणाला करितां येईल. साधारण मध्यम स्थितींतला मनुष्य आज आपल्या जसा नजरेस पडतो त्यावरून पहातां त्याच्या जीविताची गुरुकिल्ली म्हटली म्हणजे स्वार्थपरायणता हीच होय. स्वार्थपरायणता म्हणजे दुसऱ्याच्या जीवात्म्याची परवा न करितां स्वतःच्या जीवात्म्यावर क्षुद्र आणि सकपट प्रेम ठेवणें हें होय. अखिल विश्वांतील एक अशा आत्म्याविषयींच्या श्रेष्ठतर कल्पनेला

त्याच्या अंतःकरणांत बिलकुल थारा नसतो. आणि स्वार्थपरायणता हाच त्याच्या सर्व कर्मांचा मुख्य उद्देश आहे असें कळलें ह्मणजे मग त्याचेबद्दल गूढ असें कांहीं रहात नाहीं. त्याचे गुण व दुर्गुण या दोहींच्या मुळाशीं त्याची अनिवार भोगतृष्णाच आहे हें तर्कशास्त्रदृष्ट्या दाखवितां येतें. त्याची ज्ञानाविषयीं दिखाऊ हाव, आपली बायको आणि मुलेंबाळें यांच्या कल्याणासाठीं कळकळ, त्याचें वरकरणी औदार्य, दानधर्म, धैर्य, धर्मशीलपणा त्याचें वरपंगीं सरल नैतिक वर्तन आणि त्याच प्रकारची त्याची भूतदया व स्वदेशाभिमान ह्या सर्वांवर त्याच्या अधम आणि निर्लज्ज स्वार्थपरायणतेची छटा पडलेली असते व तेवढ्यानेंच हे सर्व वरील गुण जेव्हां त्याच्या ठिकाणीं विकसित होतात तेव्हां ते खरोखर उदात्त असूनहि क्षुल्लक आणि अधम असे भासूं लागतात. सारांश पराकाष्ठेची स्वार्थपरायणता हीच ज्याच्या अखिल कर्मांतील चालक तारका अशा मनुष्यानें जर आपली लग्नाची बायको ह्मणजे आपल्या फुरसदीच्या वेळांतील करमणुकीचें साधन अथवा आपल्या धन्याची अनिवार भोगतृष्णा शांत करून त्याच्या जिवाला सुख देणें हेंच ज्याचें कर्तव्यकर्म असा एक बंदा गुलाम असें मानल्यास यांत नवल तें कोणतें? स्वभावतःच तो तिला अज्ञानी आणि अक्षरशत्रु अशी ठेवतो. कारण बायकोला लिहितांवाचतां न येऊन ती अडाणी राहिली ह्मणजे तिच्यावर आपला पुरुषार्थ अधिक जोरानें गाजवितां येतो. पत्नीच्या ठिकाणीं अविश्वास असणें, ही गोष्ट अत्यंत तिरस्कारार्ह आहे असें त्याचें मत, पण तो स्वतःच जर अविश्वासाचा विषय असला, तर त्या अविश्वासापासून उत्पन्न होणारा द्वेष अनायासें नाहींसा होतो. एवंच बायकोच्या प्रेमावर कायमचा ताबा मुळींच नसल्यामुळें, तिजविषयीं मत्सरबुद्धि आणि संशय त्याचे मनांत उत्पन्न होतात व पुढें तो तिजवरील आपल्या स्वामित्वाचा दुरुपयोग करण्यास काडीभरदेखील मागें पुढें पहात नाहीं. मुलें ह्मणजे आपली विषयवासना कायदेशीर रीतीनें संतृप्त करण्यापासून उत्पन्न होणारें एक संकटच होय अशी त्याची समज होते व या दृष्टीनेंच तो तें सहन

करतो. अर्वाचीन जनहितैषी लोकांनीं आणि समाजशास्त्रवेत्त्यांनीं अशा दुर्वर्तनी लोकांस सृष्टिनियमानें नेमलेल्या कडक शासनाच्या तडाक्यांतून सुटण्याचे अनेक मार्ग दाखवून ठेविले आहेत. परंतु तेणेंकरून सृष्टीचे दुराचारप्रतिबंधक उपाय निर्बल झाले आहेत, आणि दुष्ट कामवासनेच्या अगाध समुद्रांतून तारून नेणारी एक फळी दुरुपयोगी झाल्यासारखी आहे. या गोष्टीचा परिणाम असा होत आहे कीं समाज दिवसानुदिवस अधोगतीस जात आहे; व ही अधोगति पुरुषवर्गापेक्षां स्त्रीवर्गालाच अधिक घातक होत आहे. अशा परिस्थितींत स्त्रिया दिमाखी आणि कपटी, विषयलंपट व छछोर, अडाणी आणि धर्मभोळ्या, संशयखोर आणि भित्र्या, आणि दुरंगीपणांत व खोटेपणांत अगदीं पटाईत अशा निपजल्यास त्यांत आश्चर्य तें काय? जिचा सर्व व्यापार ह्मणजे असत्याची एक प्रचंड इमारत अशा स्त्रीच्या अंगीं आणखी कोणते दुर्गुण असावयास पाहिजेत. कधीं कधीं तर मनुष्याची स्वार्थपरायणता इतकी बेसुमार होते कीं त्याचा नुसता विचारदेखील भयंकर वाटतो. या स्वार्थपरायणतेला वश होऊनच मनुष्याच्या हातून बहुतेक पातकें घडत असतात. तेव्हां ज्या मातापितरांचें मानसिक आणि नैतिक सामर्थ्य सामान्यतः ( अर्थात् कांहीं माननीय अपवाद खेरीज करून ) अशा प्रकारचें आहे, अशांच्यापासून कोणत्या प्रकारच्या प्रजेची आशा आपण करावी? अशा परिस्थितींत मानवी वर्गाच्या सर्वोत्कृष्ट प्रतिमा निर्माण होतील ही कल्पना स्वप्नांतहि मनांत आणतां येणार नाहीं. बाभळीच्या झाडाला आम्रफळें कधींतरी येतील काय?

असो. हल्लीं मानसिक आणि नैतिक गुणांचा लोप कितपत झाला आहे व त्यांची जागा स्वार्थपरायणतेनें व्यापून टाकिल्यामुळें समाजाची केवढी हानि होत आहे याचें दिग्दर्शन येथपर्यंत झालें. आतां वर निर्दिष्ट केलेलें हें काल्पनिक पूर्णस्वरूप कोणत्या प्रकारें प्राप्त करून घेतां येईल तेवढें राहिलें आहे तिकडे आपण वळूं. ज्या मार्गाचा अवलंब करावा ह्मणून मी आतां सांगणार आहें त्या मार्गानें जाऊन यशस्वी

होण्याची ज्या तरुण जनांची इच्छा असेल त्यांना माझी अत्यंत आस्थापूर्वक अशी सूचना आहे कीं त्यानीं आपल्या धर्मतत्वांविषयीं पूज्यबुद्धि असूं देण्याची संवय करावी आणि तदनुरूप आपले हातून आचरण घडत आहे किंवा नाहीं हें पहात असावें. श्रद्धेचा आणि आचरणाचा अत्यंत निकट संबंध आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. श्रद्धा तीच पूज्यबुद्धि व पूज्यबुद्धि तोच भाव. भावाच्या बलेंकरूनच हरिश्चंद्र राजानें राज्याला तृणवत् मानून त्याला लाथ मारिली. प्रल्हादानें भावाच्या सामर्थ्यैकरूनच बापाचा छळ सोशिला. ध्रुवानें अढळपद प्राप्त करून घेतलें व सावित्रीनें आपल्या सोज्ज्वळ पातिव्रत्याचा जगावर प्रकाश पाडला. सारांश भाव पाहिजे ह्मणून जे साधुसंत सांगत आले तो भाव मनःपूर्वक पाहिजे, इतकेंच नव्हे, तर आचरणांतहि व्यक्त झाला पाहिजे. आचरणाचा भावाशीं मेळ नसला तर तो भावच मिथ्या होय. साधुकवि तुकाराम महाराज यानीं भावाविषयीं जें वर्णन केलें आहे तें अगदीं यथार्थ आहे.

( अभंग )

ठेवा जाणीव गुंडून । एथे भावचि प्रमाण ॥ १
एका अनुसरल्या काज । अवघें जाणें पंढरीराज ॥ २
होणें तर्कावितर्कासी । वाव नलगे सायासासी ॥ ३
तुका ह्मणें भावावीण । अवघा बोल तो शीण ॥ ४

अतएव धर्माच्या उच्चतत्वांवर आपली अचल दृष्टी ठेवून आपलें आचरण निर्मल ठेवणें हें अधिक उचित होय. येथें हेंहि लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं संभोगक्रिया ही स्त्रीपुरुषांचें केवळ शारीरिक ऐक्याचेंच द्योतक नसून त्यांत त्यांच्या अंगच्या मानसिक आणि नैतिक तत्वांचाहि संबंध जडत असतो. आणि ह्मणून अशा प्रकारचा भानगडीचा व्यापार नियमित करण्यास उपायदेखील भानगडीचेच योजिले पाहिजेत. तेव्हां नुसत्या शारीरिक निर्बंधानींच कार्यभाग व्हावयाचा नाहीं. आपल्या धर्मानुरुप मनुष्याचा जीवात्मा हा अमर असून तो आपल्या कर्माचा

जबाबदार आहे हें तुह्मी जाणलें पाहिजे. त्याच्या प्रकृतीचीं नानाविध तत्वें एकमेकांवर क्रियाप्रतिक्रिया करीत असतात व त्यांतून खरोखर आश्चर्ययुक्त परिणाम निर्माण होतात. संसारांत मनुष्याला जे अनेक व्यामोह उत्पन्न होतात त्या सर्वप्रसंगीं त्यानें हा वरील उदात्त विचार सदैव जागृत ठेविला पाहिजे. फार तर काय पण त्याचीं सर्व कर्में या विचारानें विभूषित असलीं पाहिजेत. ही मूल कल्पना जर मनामध्यें एकदा पूर्णपणें बिंबली तर मनुष्यस्वभावाच्या नानाविध भागांत केवढी क्रांति घडून येईल हें आतां आपण पाहूं. प्रथमतः आपण हा स्थूल देहच घेऊं. शरीर हेंच धर्मप्राप्तीचें मुख्य साधन होय. **शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्** ही कविकुलगुरु कालिदासोक्ति नेहमीं ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. व शरीरांतील अत्यंत महत्वाचें इंद्रिय ह्मटलें ह्मणजे मेंदु हेंच होय. शरीरांतील राजा जो आत्मा त्याचे ह्या बाह्यसृष्टींतील सर्व व्यापार या मेंदुच्याद्वारा चालले आहेत. अर्थात् मेंदु हा त्याच्या व्यापाराचें साधन होय. हें साधन नीट रीतीनें ठेवण्यास त्याच्याशीं संबंध पोंहचणाऱ्या इतर इंद्रियांचीहि पण व्यवस्था अति सुंदर ठेवावी लागते. शरीर धडधाकड असलें ह्मणजे मनहि धडधाकड असतें असें जें ह्मणतात तें अगदीं यथार्थ आहे. तसेंच एका विद्वान् इंग्रज डाक्तराचें असें ह्मणणें आहे कीं मन जर निर्मल आहे तर शरीर निर्मल असलेंच पाहिजे. सारांश शरीराप्रमाणें मनाची सुदृढता अथवा निर्मलता कधीं कधीं कमी तर कधीं कधीं जास्ती असूं शकते. तेव्हां हें शरीर सर्व फाजील विषयवासनांना आळा घालून, पूर्ण निरोगी स्थितींत कोणच्या रीतीनें ठेवतां येईल हें आपण पाहूं. प्रथमतः जें अन्न आपण खातों, त्याकडे आपणाला अवश्य दृष्टी दिली पाहिजे. सर्व तीक्ष्ण, मिरीं मसाले घालून केलेले अतिशय चमचमीत व कामोद्दीपक पदार्थ सर्वथैव वर्ज करण्याची अगदीं संवय केली पाहिजे व शाकपाकादि सात्विक व साधें अन्नावरच आपला निर्वाह ठेविला पाहिजे. मांसान्न आणि मद्यपेय यांना तर कधींहि शिवतां कामा नये. कारण मद्य व मांस हे सर्व पदार्थ मारक आणि उद्दीपक असे असल्यामुळें, नीचवासना

उत्तेजित होऊन आत्मदमन करणें अधिक जड जातें. शिवाय हीं मादक द्रव्यें पोटांत गेलीं असतां मज्जाजालांचा दाह होतो, जननेंद्रियांचे मज्जातंतू संतप्त होतात व संतापानें विषयवासना अनावर होते. तसेंच तमाखूचें व्यसन कोणत्याहि प्रकारें लागणार नाहीं याबद्दल काळजी घेतली पाहिजे. आज तमाखूपासून एखाद्याला फायदा झालेला आहे असें एकहि उदाहरण कोणाला दाखवितां येणार नाहीं. उलटें वैद्यकीय मतें अशींच आहेत कीं, ज्यांच्या शरीराची वाढ अद्याप पूर्ण झाली नाहीं, त्यांना तमाखू ही अत्यंत घातुक आहे. त्याच्यापापासून शरीराची आणि स्नायूंची वाढ खुंटते व त्यांना अशक्तता येते. तमाखूच्या अति सेवनानें तर दृष्टीवर जबरदस्त परिणाम होतो. सारांश त्याचा स्पर्श नको. पुढें रोज सकाळीं शौचशुद्धि नियमितपणें होते किंवा नाहीं हें पाहिलें पाहिजे; कारण मलावष्टंभानें जननेंद्रियावर दाब बसून संभोगेच्छा उत्पन्न होते. तसेंच दररोज उघड्या हवेंत नियमितपणानें पुष्कळ शारीरिक व्यायाम केला पाहिजे व याच गोष्टीकडे तरुणजनांचें विशेष लक्ष असलें पाहिजे. कारण व्यायामाच्यायोगें संभोगव्यवहाराची इच्छा दबून जाते. प्रातःकाळीं नियमितपणें शौचास साफ होऊन सर्व इंद्रियांचे व्यापार अगदीं सुरळित चालतात. वासनांवर दाब ठेवण्याचे कामीं व्यायामाचा केवढा उपयोग होतो ह्याचें एक सुंदर उदाहारण सोलापूर येथील ‘ भिषग्विलास ’ मासिक पुस्तकांत माझे वाचण्यांत आलें होतें. तें मी तेथल्याच शब्दांनीं येथें नमूद करतों. “ एक गृहस्थ लग्न होण्याचे आधीं अगदीं नियमित रीतीनें वागणारा असून कॉलेजांत राहूं लागल्यापासून त्याचे मनोविकार फार उच्छृंखल होत. कधीं कधीं तर ते अगदीं अनावर होत. पण तो ह्मणाला, डाक्तरसाहेब मी त्यावर लवकरच दाब बसविला, त्याला श्रम फार पडले व त्यांत यश आलें, त्यामुळें समाधान वाटलें. मी फार व्यायाम घेऊं लागलों त्यामुळें मला यश आलें. माझ्या वेळच्या लोकांत मी पहिल्या नंबरचा वल्हविणारा होतों, मला मैथुनाची इच्छा जरा अनावर वाटली कीं लागलीच सपाटून व्यायाम घेण्यास जात असे. ह्मणून कधींहि

वेश्यागमन, स्त्रीव्यभिचार अगर असला कोणताहि अनाचार अथवा अत्याचार केला नाहीं. माझी जी शक्ति व तेज आजमित्तीस कायम आहे ती सर्व माझ्या व्यायामाचा परिणाम होय." एवढ्यावरून व्यायामाचें महत्व केवढें आहे हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. असो. प्रत्येक दिवशीं विशेषेंकरून निजण्याचेपूर्वीं प्रत्येक तरुणानें आपलें जननेंद्रिय व तेथील भाग हीं थंड पाण्यानें स्वच्छ धुतलींच पाहिजेत. कारण तसें करणें अत्यंत हितावह आहे. निजण्याचा बिछाना तर अति नरम कधींहि उपयोगी नाहीं, निदान विद्यार्थ्यांना तर नसावाच. काथ्याची अगर दुसरी कोणतीही साधारण कडक गादी करावी. तिच्यावर स्नायूंना चांगली विश्रांति मिळून गाढ निद्रा लागते व तेणेंकरून स्वप्नावस्थेसारखे अनेक अनिष्ट परिणाम टळतात. निजण्याचे खोलींत भरपूर उजेड व हवा हीं अवश्य पाहिजेत. निजण्याचेपूर्वीं मस्तक थंड पाण्यानें धुण्याची संवय अत्यंत हितावह आहे. गाढ निद्रा लागण्यास याचेसारखा अन्य सुलभ उपाय नाहीं. झोपेच्या वेळा अगदीं नियमित असल्या पाहिजेत. प्रत्येकानें पहाटे जागे होण्याबरोबर आंथरूण सोडण्याची संवय ठेवणें फायदेशीर आहे. झोपेंतून उठतांना मलाशय व मूत्राशय फुगल्यामुळें शुक्राशयावर मागून व पुढून दोन्ही बाजूंनीं दाब बसून संभोगव्यवहाराची इच्छा उत्पन्न होते, व तो करणें अगदीं जरूर आहे असेंहि कित्येकास वाटतें. पण ही समज अगदीं चुकीची आहे. ह्यास खरा उपाय ह्मटला ह्मणजे झोपेंतून जागे होतांक्षणींच मलमूत्र विसर्जन करणें हाच होय. प्रातःकाळीं थंडपाण्यानें स्नान करणें अत्यंत हितावह आहे. स्नानाचे वेळीं अंग चांगलें चोळून धुतलें पाहिजे, व लगेच खरखरीत रुमालानें चांगलें घासून काढलें पाहिजे. इतके हे अगदीं साधे नियम पूर्णपणें पाळल्यास आरोग्याची पूर्णता, शरीराची शुद्धता व वशेंद्रियत्व हीं कायम रहाण्यास अन्य शारीरिक उपायाची क्वचितच गरज लागेल. अर्थात् हे नियम साधारण आरोग्याचे लोकांकरितांच आहेत ही गोष्ट विसरतां कामा नये. व

एखाद्याचे ठिकाणीं कांहीं विशिष्ट रोगाची पूर्वप्रवृत्ति दिसून आल्यास त्या मानानें ह्या नियमांत इष्ट तो फरक जरूर करावा लागेल.

पण माझ्या तरुण मित्रांनों एवढें पक्कें लक्षांत ठेवा कीं, वैषयिक प्रवृत्तींना आपल्या पूर्णपणें ताब्यांत ठेवण्यास केवळ शारीरिक शुद्धते-कडेच लक्ष देऊन चालावयाचें नाहीं. शारीरिक शुद्धतेबरोबरच तुमच्या मानसिक आणि नैतिक स्वभावाला योग्य प्रकारचें वळण लावण्याचा तुह्मी मनाचा दृढ संकल्प केला पाहिजे. आलस्य आणि अज्ञान हे दोघे आपले महारिपू आहेत हें नेहमीं ध्यानांत असूं द्या. ह्या दोन रिपूंपैकीं आलस्याला कोणता तरी उपयुक्त व्यवसाय नेहमीं करीत रहाण्याच्या दृढ निश्चयानें जिंकतां येणें शक्य आहे. आपला एक मिनिटभरदेखील वेळ फुकट जाणार नाहीं अशी प्रत्येकानें खबरदारी घेतली पाहिजे. सर्व दिवसभर पुरेल असें काम नेहमीं आपल्या हातांत असलें पाहिजे व तेंहि अशा स्वरूपाचें असावें कीं जेणेंकरून तुमच्या मानसिक आणि शारीरिक सामर्थ्याची खरी परीक्षा होईल. या जगतीतलावर आपलें जीवित किती क्षणिक आहे, आणि कार्यभाग तर केवढा आटोपावयाचा याचा विचार केल्यास परिणामीं दुःखद अशा विषयसुखाकरितां एक क्षणदेखील घालविण्यास अवधि सांपडेल किंवा नाहीं याची शंका आहे. आपलें जीवित ह्मणजे सणावाराच्या चैनीचा व्यवसाय नाहीं. आज आपणापैकीं कितीतरी मंडळी नुसता खेळण्यांत व अन्य रीतीनें करमणुक करून घेण्यांत आपल्या बहुमोल वेळाचा दुरुपयोग करीत आहेत. पण यांत खरी करमणूक अथवा खरें सुख नसून अंतीं कोणत्या ना कोणत्यातरी प्रकारें भुर्दंड भरावा लागतो हें त्यांनीं पक्कें लक्षांत ठेवावें. त्यांच्यापैकीं प्रत्येकानें कोणत्याहि सत्कर्मीं वेळ घालविण्याचा दृढनिश्चय केला—करावा अशी त्यास माझी मनापासून प्रार्थना आहे–तर केवढी बहार होईल हें सांगण्याची अवश्यकता आहे असें नाहीं. जी कांहीं आयुष्याची थोडीबहुत अवधि त्या अवधींत आपल्या स्वतःकरितां आणि जगाकरितां कितीतरी गोष्टी

करावयाच्या आहेत ह्याचा प्रत्येकानें विचार करावा. काम केल्यानें मनुष्य कधींहि झिजत नाहीं. पण उलटें लोखंडाचें यंत्र निरुपयोगी ठेविलें असतां जसें गंजून जातें तद्वत् निरुपयोगीपणानेंच मनुष्याची जबर हानि होते. दुसरी गोष्ट चिंता. चिंतेनें मनुष्य अगदीं जळून जातो. ह्मटलें आहे ' सजीवं दहते चिंता निर्जीवं दहते चिता ' चिता नुसती प्रेताला जाळते पण चिंता सजीवाला जाळते. आपल्या आटोक्याच्या बाहेरील अशी एखादी गोष्ट घडल्यास त्याबद्दल विषाद अथवा चिंता करणें कधींहि वाजवी होणार नाहीं. नेहमीं आपलें कर्तव्यकर्म मात्र बजावीत असावें. काम करीत असतांना मन आणि सामर्थ्य हीं त्यांत अगदीं एकमय झालीं पाहिजेत. फलाशा न बाळगितां कर्तव्याकरितांच कर्तव्य बजावित रहाणें हीच अखिल कर्माची गुरुकिल्ली होय. केवळ मी हें काम करतों अथवा याचें फल मला मिळालें पाहिजे, अशा अभिमानानें जे कार्ये करितात ते अंतीं फसतात. कोणतेंहि कार्य असो. स्वतःचें असो वा जगाकरितां असो तें कर्तव्य ह्मणून मात्र निस्पृहपणाच्या उज्ज्वल प्रकाशांत झालें पाहिजे. कर्माचरणासंबंधीं **लांगफेलो** नामक अमेरिकन कवीनें काढिलेले उद्गार खरोखर संस्मरणीय आहेत.

* Let us then be up and doing,
With a heart for any fate;
Still achieving, still pursuing,
Learn to labour and to wait.

---

* ही कविता वर निर्दिष्ट केलेल्या कवीच्या (Psalm of life) जीवित स्तोत्रांतील एक आहे. हें स्तोत्र किती हृदयंगम आहे, हें इंग्रजी वाचकांस ठाऊक आहेच. त्यांतील चटकदार उपदेशाप्रमाणें तरुण पिढीनें आपल्या जीवनक्रमास वळण लाविल्यास त्यांचा अत्यंत फायदा झाल्यावांचून राहणार नाहीं. या सद्धेतूनें तें समग्र स्तोत्र व त्याचें श्रीयुत **मल्हार खंडेराव चिटणीस,** बी. ए., एल्एल्. बी. यांनीं केलेलें कविताबद्ध भांषांतर आह्मीं मुद्दाम प्रथमारंभीं दिलें आहे.

हें सारांशरूपानें सांगावयाचें ह्मणजे असें कीं 'आलस्य' रिपूला जिंकून आपलें कर्तव्य आपण बजावूंया. फलविषयीं फिकीर करणें आपलें ब्रीद नाहीं. नशीबांत जसें असेल तसें होईल. उद्योग मात्र करूंया. उद्योगी राहून पुरुषार्थ साध्य करण्याची खटपट करूंया. कर्म करण्यास शिकणें हें आपलें काम आहे. कर्म केल्यानंतर असुकच फल प्राप्त व्हावें, अशी आशा न करितां फल कोणतें मिळतें त्याची मार्गप्रतीक्षा करण्यास मात्र शिकावयाचें. असो. भगवंतांनीं आपला भक्त अर्जुन यास केलेल्या उपदेशाची मज़ल तर याच्याहि पुढें आहे. भगवान् ह्मणतात.

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन
कर्म करण्याचा अधिकार तुला आहे।
फलविषयीं तूं शून्यचित्त राहे॥

सारांश कर्माचरण करण्याचे कायते आपण अधिकारी आहोंत; पण तज्जन्य फलाचे नाहींत. कर्माचें फल काय होईल तें होऊंद्या. तिकडे लक्ष पुरविण्याची आपल्याला गरज नाहीं. एखाद्याचे उपयोगी पडावें अशी सद्वासना तुमच्या मनांत उदय पावली तर त्या मनुष्यानें तुमच्याशीं कशा रीतीनें वागावें याबद्दल तुमच्या मनांत कधींहि विचार येऊं देऊं नका. हेंच **कर्मयोगा**ची अत्युदात्त कल्पना आहे. ह्या कल्पनेंपर्यंत मजल आली ह्मणजे काम करण्याची खरी गुरुकिल्ली तुमच्या हस्तगत झालीच ह्मणून समजा. व एकदां ही गुरुकिल्ली हाती लागली ह्मणजे आयुष्यरूपी नदीच्या प्रवाहाबरोबर वाहत वाहत केव्हां तरी पूर्णपणें निरिच्छातीराला जाऊन पोंहचूं असा दिन उदय पावेल. कर्ममार्गाचे दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास निरिच्छा ह्मणचे केवळ 'फलशून्यत्व' हाच अर्थ घ्यावयाचा. अशा रीतीनें निरिच्छ झाल्यावर अमर्याद मानसिक स्वास्थ्य तुह्माला प्राप्त होईलच होईल. असो.

आतां आपला दुसरा रिपु अज्ञान. याला जिंकण्यास तुह्माला सदोदित नम्रवृत्ति धारण करावी लागेल. प्रत्यहीं नूतन प्रकाश आंत पडावा ह्मणून तुह्मी आपल्या मानसमंदिराची खिडकीन् खिडकी उघडी ठेविली

पाहिजे. केवळ ज्ञानाकरितांच ज्ञानाची गहन हाव तुह्माला असली पाहिजे. फार तर काय तुमच्या संभाषणाचे आणि करमणुकीचे प्रसंगहि असेच असले पाहिजेत कीं तेणेंकरून तुमच्या ज्ञानसंचयांत प्रत्यहीं अधिक भर पडेल. हलकट भाषणें, वायफळ बोलणें, नसती टवाळकी करणें, आणि दुसऱ्याची निष्कारण निंदा करणें हीं कृत्यें ग्राम्य मनुष्याचीं असून त्याचीं त्यालाच शोभूं जाणें. कामविचारांनीं आपलें मन कधींहि कलुषित होऊं देऊं नका. अश्लील भाषेचा सर्वथैव त्याग करावा. नेहमीं मन सुविचारांनीं प्रफुल्लित असूं द्या, कारण विचार हा कार्याचा जनक आहे हें लक्ष्यांत असूं द्या. जसे विचार उद्भवतील तशीं कार्यें निर्माण होतील. नीच सुखप्राप्तीकरितां तुमच्या मनाला प्रिय झालेल्या आणि उदात्त अशा महत्वाकांक्षांवर पाणी सोडूं नका. ज्यांत नामांकित ग्रंथकारांच्या उदात्त विचारांचा परिमल केवळ कोंदाटून राहिला आहे, अशा सुंदर पुस्तकोद्यानांत जितका वेळ मन रमवितां येईल तितकें रमवा आणि त्यांतील सुविचारपरिमलांनीं तें प्रेरित होऊं द्या. तुमच्या वृत्ती स्फुरण पावूं द्या. पुस्तकांची थोरवी लहानसहान नाहीं. तीं तुह्मा आह्माला ज्ञानामृत पाजणारे अक्षय्य स्नेही होत. तीं मनुष्याकारें प्रकट झालेलीं आणि नाना वस्तूंच्या विचारांनीं कोंदाटलेलीं अशीं विवेकनिधीचीं भांडारें होत. तीं नाना प्रयोगाकारणें विश्वजनांच्या उपयोगी पडणारीं सुखाचीं साधनें होत. सारांश, वाचनाचें सौख्य ज्याला नाहीं, अशा प्रकारचा राजा होऊन, ऐश्वर्योपभोग घेण्यापेक्षां नाना प्रकारच्या सुंदर ग्रंथानीं भरलेल्या पर्णकुटिकेंत गरिबींत राहणें हें अधिक श्रेयस्कर आहे. धर्माची आणि नीतीची केव्हांहि थट्टा करूं नका. कारण तसें करणें ह्मणजे पुण्यवस्तूला दूषण लावणें होय. विचार, उच्चार आणि आचार ह्या त्रयींत केव्हांहि प्रामाणिकपणा, सद्गुण आणि सत्य याचा मार्ग सोडूं नका. तत्वज्ञान आणि शास्त्रें निर्माण होतील आणि जातीलहि; परंतु हीं तत्वें अक्षय्य आहेत, प्रत्येक युगाच्या कसोटीस उतरलीं आहेत आणि तीं खऱ्या वैभवाला नेऊन पोंहचविणारीं आहेत. धर्माची निंदा करण्यास एकदम तयार कधींहि होऊं नका. त्यांत कोणतीं उदात्त-

तत्वें भरलीं आहेत तीं अगोदर पहा. एकानें नाक मुरडलें ह्मणून तुह्मीहि अंधळ्यासारखा त्याचा अनुवाद गाऊं नका. धर्म कसाहि असो त्याला मान द्या. तुमचें स्वतःचे अज्ञान उघडपणें कबूल करा. ह्मणजे तो तुमचा तुह्मालाच अधिक चांगला कळूं लागेल असा काल येईलच येइल. अशा रीतीनें जर तुह्मी वागाल, एकाद्या उपयुक्त अथवा देश-हिताचे कामीं आपलें मन लावाल, स्त्रीपुरुषाविषयीं आदरबुद्धि ठेवाल तर तुह्माला वैषयिक त्रास मुळींदेखील जाचणार नाहीं हें पक्कें लक्षांत ठेवा. जीवनक्रम सुखावह होण्यास अत्युत्कृष्ट मार्ग ह्मटला ह्मणजे कर्तव्यकर्म चांगल्या रीतीनें बजाविणें हाच होय. सत्कर्म हीच आपल्या आरोग्याची रोजची परीक्षा असून आरोग्यसंरक्षकहि तेंच आहे. एकं-दरींत विषयाच्या सर्व त्रासांतून सुटण्याचा अत्युत्कृष्ट उपाय ह्मटला ह्मणजे मन मानेल त्या अथवा अधिक सयुक्तिकपणें सांगावयाचें ह्मणजे तुमची सदसद्विवेकबुद्धि सांगेल त्या देशहिताचे कार्यांत अंतस्थ कळ-कळीनें पडून अश्रांत श्रम करणें हाच होय. जाग्रत्स्थितींत त्याचें चित्र तुमचेपुढें असूंदे व निद्रेंतदेखील तुह्मांस त्याचींच स्वप्नें पडोत.

वरील विवेचन मी एवढ्याच उद्देशानें केलें आहे कीं, तरुण मंड-ळीनीं आपल्या अंगचें ओज शुद्ध करावें आणि संतानोत्पादनाचे कामीं खर्ची पडणारा भाग खेरीज करून बाकीचा सर्व भाग एखाद्या थोर आणि उपयुक्त व्यवसायाकडे लावावा. ही गोष्ट अगदींच असाध्य आहे असें तुह्माला वाटतें काय? असें असेल तर मानसिक आणि नैतिक स्थितीचा शारीरिक व्यवसायावर किती परिणाम होतो, याची तुह्माला कल्पनाच नाहीं असें ह्मणावें लागेल. द्रव्यलोभ, कीर्तिलोभ अथवा दुसऱ्या एखाद्या प्रबल मनोविकारानें ज्याचेवर इतका पगडा बसविला आहे, ज्याचे सर्व व्यापार अशा विकारानें इतके नियंत्रित झाले आहेत कीं जो स्वसंरक्षणाचीदेखील पर्वा करीत नाहीं असा माणूस तुमच्या दृष्टीस आजपर्यंत कधींहि पडला नाहीं काय? तर मग विषयवासना या मनोविकारांहून अधिक उच्छृंखल आहे काय? उत्क्रांति आणि समाज

यांच्या कार्याकरितां न्याय्य तितका व्यय करून बाकी राहिलेल्या सामर्थ्याचा विनियोग अधिक चांगल्या आणि श्रेयस्कर कार्याकडे करितां येणार नाहीं काय? मला वाटतें खात्रीनें करितां येईल. अशा रीतीनें प्रजा उत्पन्न होऊन त्यांचें संगोपन करण्याचें सामर्थ्य जसें असेल त्याप्रमाणें केवळ उपजाति निर्माण करण्याच्या अवश्यकतेपुरतीच जर रतिसुखाची मर्यादा रेखाटली तर तें कित्येकांचे दृष्टीनें निर्दयपणाचें होईल हें मी जाणून आहें. पण त्याला इलाज नाहीं. कनिष्ठ कोटीची सृष्टि आणि प्राचीन सत्पुरुषांचें आचरण याकडे नजर फेंकिली तर वरील सिद्धांतावांचून दुसरा सिद्धांतच निघत नाहीं. अर्वाचीन प्रसिद्ध इंद्रियविज्ञानशास्त्रवेत्ते देखील याच मताचा अनुवाद करीत आहेत. लोकसंग्रहकर्ते, समाजनेते, उत्क्रांतितत्ववादी आणि आरोग्यशास्त्रवेत्तेदेखील हाच स्वार्थत्याग पाहिजे ह्मणून ह्मणत आहेत. आणि तद्विरुद्ध कोणाचीहि कुरकुर न्याय्य होणार नाहीं. वाचकवृंदांपैकीं कित्येक असें ह्मणतील कीं, उपपत्तीच्या दृष्टीनें ह्या वरील सिद्धांत बरोबर आहे हें आह्मी कबूल करूं, पण तदनुरूप आचरण होणें मात्र शक्य नाहीं. यावर माझा एवढाच प्रश्न आहे कीं ह्या रीतीनें तुह्मी कधीं खऱ्या भावानें आणि मनापासून प्रयत्न करून पाहिला आहे काय? जर केला नसेल तर तसें आचरण घडणें शक्य नाहीं असें एकदम ह्मणण्यापूर्वी तसा प्रयत्न अगोदर करून पहा. एवढेंच माझें सांगणें आहे. जर काल्पनिक पूर्ण स्वरूपाप्रत तुह्माला जातां येणें अशक्य वाटत असेल—व ती गोष्ट फारच थोड्यांना शक्य आहे—तर आपापल्या शक्त्यनुरूप तरी अत्युत्कृष्ट स्वरूपाप्रत जाऊन पोंहोंचण्याचा दृढ निश्चय करा. कदाचित् अपयश येईल. पण अपयश आलें ह्मणून धैर्य खचूं देऊं नका. आपल्या मार्गाला लागा. आणि कदाचित् वर्षा दोन वर्षांचे कांठींच तुमच्या निश्चयबलाचें फल असें कांहीं आश्चर्य करण्याजोगें तुमच्या नजरेस पडेल कीं, विषयसुखाचे दृष्टीनें पूर्वींचे तुह्मी आतां नाहींत. शर्करेचें माधुर्य दुसऱ्यानें शब्दानें सांगून आणि आपण कानानें ऐकून कळणारें नाहीं. ती गोडी स्वानुभवानें कळत असते. तद्वत् इंद्रियनिग्रही मनुष्याचें जीवित किती

धन्य असतें, तो केवढा सुखी असतो ह्याचें इंगित स्वानुभवावांचून कळणें नाहीं. कालांतरानें तुमचें तुह्मालाच कळेल कीं, इंद्रियनिग्रहाचरणाला मर्यादा ह्मणून नाहीं; व योगिजनांच्या नैष्ठिक ब्रह्मचर्याची प्राप्ति शक्य आहे असें वाटून तें तुमचें काल्पनिक पूर्ण स्वरूप होऊन बसेल.

शिवाय शुक्राशयाचा आणि ज्ञानवाहिन्याचा अगदीं निकट संबंध आहे इतकेंच नव्हे तर उभयतांची रचना अगदीं सारखी आहे हें लक्ष्यांत असूं द्या. तसेंच सामर्थ्याचें सर्व उच्चतर प्रकटीकरण, मग तें बाह्यसृष्टींत असो वा अंतःसृष्टींत असो मुख्यत्वेंकरून अत्यंत पूर्ण स्वरूप प्राप्त झालेल्या आणि उच्चतर अशा ऐंद्रिय रचनेवरच अवलंबून आहे. निग्रो लोक केवढे दांडगे! पण पातळ आणि सडपातळ अरब लोकांनीं त्यांना रानटी पशूप्रमाणें हाकलून लावावें ह्यांतील इंगित काय? तर त्यांची उच्चतर ऐंद्रियरचना हेंच होय. तसेंच हत्ती दिसण्यांत केवढा भव्य प्राणी पण वनराज केसरीसमोर त्याला पळतां भुई थोडी होते. सारांश वीर्यसंरक्षणाविषयीं काळजी करावी तेवढी थोडी. वीर्यनाशाच्या प्रत्येक समयीं तुमच्या ज्ञानतंतूचा ऱ्हास होत आहे. तुमचे ज्ञानतंतू हेंच तुमचें सामर्थ्य. स्त्रीवर्गाचें पुरुषवर्गावर जें प्रेम असतें तें त्याच्या अंगच्या सामर्थ्यावर असतें ही गोष्टदेखील विसरतां कामा नये. आणि जर तिला असें कळून आलें कीं पुरुषाला आपल्या गुलामांवर—षड्विकारांवर—देखील गाजविण्याइतकें सामर्थ्य नाहीं तर तो तिच्या खऱ्या प्रेमाला मुकलाच ह्मणून समजावें. ह्मणून तरुण मित्रानों उच्चतर हेतूची जरी गोष्ट बाजूला ठेविली तरी स्त्रीप्रेमाकरितां निदान तुह्मी आपलें वीर्य जें तुमचें प्राणतत्व त्याचें योग्य जतन करा. हीं सत्यें अनुभवांतीं तुह्माला कळून येतील व त्याबद्दल तुह्माला पश्चात्ताप वाटल्याखेरीज राहणार नाहीं. तर मग वेळींच सावध झालेलें बरें नाहीं काय? इंद्रियनिग्रह करा, मिताहार ठेवा, ह्या नियमांचें उल्लंघन कधींहि करूं नका. इंद्रियांच्या अधीन होऊन त्यांचे बंदे गुलाम बनूं नका. सारासारविचार आणि न्यायबुद्धि हे मनुष्याच्या स्वभावांतील दोन ठळक गुण

आहेत. त्यांचेंच साम्राज्य असूं द्या. त्यांच्या सोज्ज्वल प्रकाशावांचून एक पाऊलहि तुह्मीं पुढें टाकूं नका. थोर परोपकारी पुरुषांचे या विषयावरील ग्रंथ वाचा. त्यांत काय सांगितलें आहे त्याचें नीट मनन करा. त्यावर विश्वास असूं द्या. तदनुरूप आचरण करण्याचा प्रयत्न करा व अंतीं परमेश्वर कृपेनें तुह्माला सौख्य लाभल्यावांचून राहणार नाहीं.

असो. वरील विवेचनावरून वाचकांचे लक्षांत आलेंच असेल कीं, व्यवस्थित आणि काल्पनिक पूर्णस्वरूपाचा गृहस्थाश्रम हाच व्यावहारिक दृष्ट्या ब्रह्मचर्याश्रम होय. उच्छृंखल कामवासनेच्या पुरुषाला एकदम पूर्णपणें आत्मदमन करण्यास संन्यासी अथवा ब्रह्मचारी होतां येईल असें जर कोणास वाटत असेल तर ती चूक आहे. हिंदुशास्त्रांतर्गत जो चतुर्थाश्रम—संन्यास—तो ग्रहण करण्यास बाजवी रीतीनें जर कोणी अधिकारी असेल तर गृहस्थाश्रमांत राहून ज्यानें आत्मदमन केलें आहे व ब्रह्मचर्यव्रत पूर्णपणें पाळिलें आहे असा गृहस्थच होय. व जे आपल्या विषयवासनांना स्वैर गति देऊन यथेच्छ विषयसुख घेण्यांत आपल्या शरीराला आणि आपल्या समाजाला अगदीं विसरून गेले आहेत, त्यांनीं केवळ गृहस्थाश्रम या नांवाला कलंक लाविला आहे. ज्यांच्या धवल कीर्तीचा दुंदुभि आज सर्वत्र दुमदुमत आहे अशा थोर आर्यांचे आपण वंशज ही गोष्ट जाणून आपलें ब्रीद कायम राखणें हें आपलें कर्तव्य नव्हे काय? हें कर्तव्य बजाविणें गृहस्थाश्रम्याला दुष्कर नाहीं. गृहस्थाश्रमी व तपस्वी यांच्यांत जो विशेष आहे तो हाच कीं, तपस्वी आत्मीय उन्नत्यर्थ करावीं लागणारीं कर्तव्यें तेवढीं बजावून मोकळा होतो; समाजाची तो पर्वा करीत नाहीं. पण गृहस्थाश्रम्याला आत्मीय कर्तव्यें तर सांभाळावीं लागतातच पण तीं सांभाळूनही समाजाकडे लक्ष पुरविणें त्याला भाग पडतें. एवंच वैषयिक दृष्टीनें पहातां विवाह हाच ब्रह्मचर्यव्रताचा पाया होय हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. कारण विषयसुखाचे बाबतींत विवाह व ब्रह्मचर्य यांतील विशेष ह्मणजे अंशमात्राचा आहे व तोहि फार मोठा आहे असें नाहीं. गृहस्थाश्रम व्यवस्थितपणें पाळण्यासाठीं प्राचीन

शास्त्रांनीं जे नियम घालून दिले आहेत त्यांचें, अर्वाचीन वैद्यकीय शास्त्राच नियम पुष्टीकरण किंवा न जाणतां अनुवादच करीत आहेत हीहि गोष्ट वाचकांना माहीत असेलच. हळूहळू कां होईना, पण या विषयांत नवे आणि जुने यांची एकवाक्यता होऊन ते उभयतां एक मार्गानें जात आहेत ही केवढी समाधानाची गोष्ट आहे. आपल्या प्राचीन परोपकारी ऋषिवर्यांनीं काळजीपूर्वक आंखून दिलेल्या ह्या जीवित-नियमांचें उल्लंघन केल्यामुळें आज आपण या स्थितीस आलों व असेंच जर आपण पुढेंही उल्लंघन केलें तर आपल्या कृतकर्माचें फल भोगणें आपणास फार जड जाईल यांत संदेह नाहीं. तेव्हां तरुण जनांनीं वेळींच जागें व्हावें व दुसऱ्यासहि जागें करावें एवढा फिरून एकवार इषारा देऊन वाचकांची रजा घेतों व परमेश्वरापाशीं सर्व तरुण जनांना

'सुसंगति सदा घडो ; सुजनवाक्य कानीं पडो ;
कलंक मतीचा झडो ; विषय सर्वथा नावडो ।
सदंघ्रिकमळीं जडो ; मुरडितां हटानें अडो ;
वियोग घडता रडो ; मन भवच्चरित्रीं जडो ॥

अशी मयूरवाणीनें प्रार्थना करून लेखणी खालीं ठेवतों.

ॐ तत्सत्

---

आ

## *A PSALM OF LIFE.*

# जीवित-स्तोत्र.

Tell me not, in mournful numbers
" Life is but an empty dream "
For the soul is dead that slumbers,
And things are not what they seem. I

( वृत्त—वसंततिलका. )

' स्वप्नापरि मनुजजीवित हें असार, '-
ऐसा विलापपर सांगु नको विचार ।
' नाहीं पहा मनुजजीवित हें असार, '-
ऐसें कितीक वदले बुध थोर थोर ॥ १ ॥

कर्तव्य जो न करि, तो नर भूमिभार;
राहे जिवंत, परि, तो मृत हेंचि सार ।
जैशी दिसे स्थिति तशी न तुवां गणावी,
हें सत्य पूर्ण अवघें नरजन्म दावी ॥ २ ॥

Life is real. Life is earnest.
And the grave is not its goal.
" Dust thou art, to dust returnest ",
Was not spoken of the soul. II

आहे पहा मनुजजीवित सत्य सत्य;
खाणें पिणें मरण हेंचि न जीवतथ्य ।
कर्तव्यकर्म करणें, मन ईशपादीं
ठेवूनि नित्य असणें, तरि जीवसिद्धि ॥ ३ ॥

' भूतेंचि पांच मिळतां नरजन्म येई
अंतीं उरे न किमपी तव भस्म होई; '—।
हें जें तुला वदति केवळ सत्य देहीं,
आत्मा अखंड अविनाशि अनंत पाही ॥ ४ ॥

Not enjoyment, and not sorrow
Is our destined end or way;
But to act, that each tomorrow
Find us farther than to day. III

खाणें पिणें सतत रे! सुखदुःखभोग
हा जीवहेतु समजे बुध कोण सांग? ।
कर्तव्यकर्म करि, जें करितां मनाची
होई उद्यां प्रगति, जी नचि आजि साची ॥ ५ ॥

Art is long, and time is fleeting,
And our hearts though stout and brave,
Still like muffled drums, are beating
Funeral marches to the grave. IV

शास्त्रें अपार, नरजीवित अल्प आहे;
तेंही किती झरझरा बघ जात राहे! ।
होशी कितीहि जरि शूर हुशार धीर,
नेणार काळ तरि जाण तुला अखेर. ॥ ६ ॥

In the world's broad field of battle,
In the bivouac of Life.
Be not like dumb driven cattle!
Be a hero in the strife. V

संसारघोरसमरीं करि जन्म सार्थ;
धैर्यें पराक्रम करी जनताहितार्थ; ।
निःसत्व–मूक–पशुवृत्ति न आदरावी;
वीरत्व पावुनि जना हितमार्ग दावी. ॥ ७ ॥

Trust no future, however pleasant!
Let the dead Past bury its dead!
Act—Act in the living present!
*Heart within, and God overhead.* VI

गेलाचि काळ विसरे, मनिं तो न आणी,
येईल काळ बरवा क्षणही न मानी,।
जो चालला क्षण खरा अपुला गणावा,
कर्तव्य त्यांत करुनी प्रभु आळवावा. ॥ ८ ॥

Lives of great men all remind us,
We can make our lives Sublime,
And, departing, leave behind us
Footprints on the sands of time; VII

Footprints that perhaps another,
Sailing over life's solemn main,
A forlorn and shipwrecked brother,
Seeing, shall take heart again. VIII

जे थोर सत्पुरुष तच्चरितें पहावीं,
कां तत्समान अपुलीं चरितें न व्हावी?।
या कालसागरतिरीं निज पावलें तीं
वाळूवरी उमटवूं, जइं जाउं अंतीं. ॥ ९ ॥

तीं पावलें सहज दैववशात् दिसोनी
संसारसागरनिमग्नहि दीन कोणी
जो बंधु, त्यास मग येईल कांहिं धैर्य,
कांहीं कदाचित घडेलहि थोर कार्य. ॥ १० ॥

Let us then be up and doing,
With a heart for any fate;
Still achieving and still pursuing,
Learn to labour and to wait. IX

सोडोनि आळस तरी करि उद्यमातें;
जें जें घडे सहनही करि सर्व तें तें;
साधी समीहित सदा, करि यत्न फार;
होवोनि कार्यरत चित्तिं धरीहि धीर. ॥ ११ ॥

**मल्हार खंडेराव चिटणीस.**

